रविकिरणमण्डळाचें चौतिसावें पुस्तक

# मानसमेघ

[ स्फुट कवितांचा सङ्ग्रह ]

गिरीश

सदस्य, रविकिरणमण्डळ

मूल्य दीड रुपया

# प्र का श

...“त्या दिवशीं नैनितालमधील ‘चायना पीक’ वरून आम्ही हिमालयाच्या सुन्दर शिखरांची समोर दिसणारी अपूर्व शोभा न्याहाळीत बसलों होतों. जिकडं तिकडं उन्च नि विशाल डोङ्गर व शुभ्र नि चमकणारीं शिखरं! टोंकावरून जाणारीं ढगांचीं शुभ्र नि धूसर वेटाळीं व त्यावर सूर्याच्या कोवळ्या किरणानं खुलणारे विविध रङ्ग! अनन्त विस्तार, अलोट सौन्दर्य नि अथाङ्ग शान्ति! नुसती मौजच मौज!! कितीहि पाहिलं तरी तृप्ति होईना! शेवटीं परतण्याची वेळ झाली, म्हणूनच आम्ही डोलींत बसून उतरूं लागलों. उतरतां उतरतां अधीऱ्या मनानं पुन्हा एकदां समोरच्या मानसशिखराकडं पाहिलं, तों एक नवीन अत्यन्त सुन्दर शुभ्रधूसर मेघमाला त्याचं टोंक वेटाळून पुढं चालली होती व शिखरावरील बर्फावर नि मेघमालेच्या वलयावर विविध रङ्ग चमकत होते. ‘मानसमेघ! मानसमेघ!’ असं कायसंसं मी मनाशीं म्हणालों व त्यांतूनच त्या दिवशीं माझी ‘मानसमेघ’ ही कविता उमलली. मनुष्याचं मन देखील बऱ्यावाईट गोष्टींनीं कधीं कधीं असंच ढगाळतं......आणि पुढं माझ्या पुढील काव्यसङ्ग्रहालाहि हेंच नांव द्यायचं मीं त्या वेळीं ठरविलं!”......

चारपांच वर्षांपूर्वी एका स्नेह्याला लिहिलेल्या पत्रांतील या उताऱ्यावरून या सङ्ग्रहाच्या नांवाची कांहींशी कल्पना येईल. यांत गेल्या नऊ वर्षांतील स्फुट कविता एकत्रित केल्या आहेत.

श्री. ढवळे हे आज त्या प्रकाशीत आहेत. या कामीं माझे विद्यार्थिमित्र प्रा. श्री. शं. खानवेलकर यांचें अनमोल साहाय्य झालें, त्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहें.

गिरीश

विश्रामबाग, साङ्गली

२८ सेप्टेम्बर, १९४३

# अनुक्रमणिका

# श्री. गिरीश यांचीं पुस्तकें

## प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| १ | अभागी कमल ( वैधव्यजीवनावरील करुण खण्डकाव्य ) | १—० |
| २ | कला ( प्रणयाचें सौन्दर्य दर्शविणारें खण्डकाव्य ) | ०—६ |
| ३ | आम्बराई ( शेतकरी जीवनावरील खण्डकाव्य ) | १—० |
| ४ | काञ्चनगङ्गा ( स्फुट गीतांचा सङ्ग्रह १ ) | १—८ |
| ५ | फलभार ( स्फुट गीतांचा सङ्ग्रह २ ) | ०-१२ |
| ६ | काव्यकला ( टीकात्मक गद्य लेखसङ्ग्रह ) | १—० |
| ७ | मराठी नाट्यछटा ( नाट्यछटेवरील टीकात्मक प्रबन्ध ) | ०—८ |
| ८ | मानसमेघ ( स्फुट गीतांचा सङ्ग्रह ३ ) | १—८ |

## आगामी

अनिकेत ( भाषान्तरित खण्डकाव्य )

नीलिमा ( रसग्रहणें )

शरत्प्रभा ( टीकात्मक गद्यलेखसङ्ग्रह )

प्रीतिसङ्गम ( खण्डकाव्य )

## पुस्तकें मिळण्याचे पत्ते

( १ ) पुणें व मुम्बई येथील सर्व पुस्तकविक्रेते

( २ ) लेखकाकडे, विलिङ्ग्डन कॉलेज, साङ्गली

# १ मानसमेघ

[ **भूमिका :** नैनिताल येथील 'चायना पीक' टोकावरून दूरवर दृष्टि फेकली असतां, मानस, नन्दादेवी आदिकरून उच्च शिखरें दिसतात. त्यांच्यावरून ढग जाऊं लागले कीं सूर्य किरणांनीं त्यांची शोभा वाढते. समोर हीं शुभ्रसुन्दर शोभा पहातांना व आपण मायभूमीच्या एका टोकाला आलेले आहों, ही जाणीव होत असतांना काय वाटतें, याचेंच भावचित्र खालील कवितेंत आहे. ]

[ वृत्त : सुमन्दारमाला

तुझी शुभ्र उत्तुङ्ग शैलाग्रमाला
नभीं शोभते ही हिमानें किती !
किती दूर विस्तार हा पाङ्गलेला
निळापाण्ढरा सिन्धु वा भोंवतीं !
अनन्तावधी उच्च लाटा नगांच्या
उधाणून कीं नाचती भूवरी ?
जलक्रीडना पातलेली गजांची
नवी झुण्ड वा पोहते अन्तरीं ? १

किती देवदारू उभारून शीर्षें
तुझीं वैभवें पाहती तिष्ठुनी !
उड्या झोत घेती तुला भेटण्याला
प्रपातींच जाती परी गोठुनी !
निवाऱ्यास बैसून शोभा तुझी ही
डहाळ्यांतुनी पाहतीं पांखरें !
नभांतून येऊन ही रश्मिमाला
कशी नाचते सप्तरङ्गीं त्वरें ! २

चकाकून बर्फाळलीं उन्च टोकें
किती दाविती व्योमरङ्गावली !
तुझें टोंक वेटाळुनी मेघमाला
महासिन्धुफेसापरी चालली ;
किती शोभती हे नभःकार्मुकाचे
महामानसा ! रङ्ग तूझ्यावरी !
तुझा 'आन्तरः कोऽपि हेतुः' स्वभावें
उमाळून येई असा वा वरी ? ३

असे वोपिला यक्षसन्देश, त्याचे
मनोराग हें कोवळे साण्डले ?
प्रभावी उमेच्या तपाचें असें वा
गिरीशापुढें तेज वोसण्डलें ?
असे दृष्टिची फेक वा ऊर्वशीची
पुरूदर्शनीं वेधुनी राहिली ?
तपस्वी तरङ्गून वा हंसचित्तें
अशीं मोक्षमार्गास कीं लागलीं ? ४

मनोहारिणी मेघमाला निघाल्या
कुठें उंच सञ्चारुनी रङ्गुनी ?
तपस्वी शुका ! चाळवाया तुला कीं
सुवर्णाङ्ग आल्या कुणी कञ्चनी ?
तुझें बोधिसत्वा ! हरायास आल्या
कुणी सत्त्व वा राजदेवाङ्गना ;
पराभूत होऊन वेगें निघाल्या
घरा आपुल्या लाजुनी मोहना ? ५

" स्वतन्त्र ध्वजा नाचुनी अन्तराळीं
स्वराष्ट्रास देतीं नवीं वैभवें !–"
वरी मान उन्चावतांना तुला कीं
दिसे दृश्य हें भोंवतालीं नवें ?
तुझ्या अन्तरीं आग पेटून, वाढे
तुझें आंतल्या आंत अङ्गारणें ?
ज्वलद्‌भाव अन् हे उफाळून येती
वरी मेघरूपें, कराया रणें ? ६

हिमानें तुझी कोन्दली आंत वाणी
वदायास येई न कांहीं, कुठें,
स्फुरद्वैखरी मूकभाषी, म्हणूनी
तुझ्या आज कण्ठांतुनी ही फुटे ?
कधीं तापुनी गर्जती गूज सारें
तुझे बोलके, साङ्ग, चिन्तामणी ?
नव्या हिन्दवी वैभवाची श्रवूं दे
तुझी, मानदण्डा ! मला अश्रणी !

१० नोव्हेंबर, ३९
नैनिताल

## २ चान्दण्यांतील भेट !

[ **भूमिका :** आपला एकुलता एक मुलगा मृत झाल्यामुळं, भ्रान्तचित्त झालेली एक आई, वेड्या आशेनं 'त्याची सावली तरी पुन्हा कुठं दिसेल का', म्हणून तळमळत आहे. मृताची सावली चान्दण्या रात्री दिसते, असं कुणीसं तिला साङ्गितलं. म्हणून एका चान्दण्या अपरात्रीं कृष्णाकोयना-सङ्गमानजिक असलेल्या, आपल्या घराच्या अङ्गणांत चिन्चेच्या झाडाखालीं उभी राहून, ती शोधक नजरेनं इकडं तिकडं न्याहाळीत आहे, नि तोण्डानं पुढील शब्द उच्चारीत आहे. ]

[ जाति : केशवकरणी

जीव तुझ्यास्तव शिणला बाळा ! व्याकुळलें अन्तरीं,
कुठें मी शोधूं तुजला तरी ? ॥ ध्रु० ॥

मज भयाण सारें भासें या अङ्गणीं !
किति उसासुनी मी न्याहाळूं चान्दणी !
कां चान्दण्यांत या हिरमुसले हे मणी ?
आणि कोणती मूर्त सावळी समजूं तव अम्बरीं ?
कुठें मी शोधूं तुजला तरी ? १

चान्दणें बहरलें किति हें चोहीकडे !
धवळलें सङ्गमीं पात्र आणि हे कडे !
भेसूर शान्तता छायेंतुन कां दडे ?
निश्चल पानें, वारा, पाणी बघतीं ऐसि कां परी ?
कुठें मी शोधूं तुजला तरी ? २

येऊन समोरुन कृष्णा अन् कोयना—
भेटती परस्पर, देउन आलिङ्गना;
आनन्द जाहला प्रीतिसङ्गमीं मना;
शमवाया पोटाग कधीं मी पोटाशीं तुज धरी ?
कुठें मी शोधूं तुजला तरी ? ३

चान्दण्यांत दिसते केव्हां तव सावली,
बघण्यास धावलें, म्हणुन, मूर्त सावळी !
किती कणाकणांतुन ऐकूं तव चाहुली !
झुळुक, अहाहा ! हले सावली कसली तीरावरी ?
कुठें मी शोधूं तुजला तरी ? ४

१२ जुलै, ३६
पुणें

# २ आईचा आशीर्वाद

[ **भूमिका** : वयाच्या चवथ्या वर्षी आई वारलेल्या नि तेव्हांपासून आज बारा तेरा वर्षपर्यंत घरांतील वडीलधाऱ्यांनी उत्तम सङ्गोपन करून प्रेमानं वाढविलेल्या एका कन्येचं आज लग्न आहे. लग्नमण्डपांत आशीर्वाद देण्यासाठी अनेक आप्तेष्ट आले आहेत. तिचे वडिलहि आपला आशीर्वाद देतात. पण, आपली मुलगी सुस्थळी पडून, तिच्या जन्माचं कल्याण व्हावं, म्हणून कन्येच्या भोंवती भोंवती आजवर वावरणारा आईचा आत्मा त्याच वेळी मण्डपांत आला आहे, नि तो तिला आशीर्वाद देत आहे. ]

[ छन्द : ओवी

" शुभ मङ्गल ! मङ्गल ! सावधान ! सावधान !
बोलतें मी आई जाण.

झाला वियोग तपाचा, बाळ, भरावलें किती,
तुझ्या लीला आठवती.
होतीं कौतुक करीत किती तुझं सारीजणं,
शान्तवलं माझं मन.
पण आईचा हा जीव किती झालं तरी, बाई !
आशीर्वाद आज देई. १

नाहीं पुरतं मी न्हाऊं माखूं घातलं तूजला,
माण्डी दिली निजायला !
पाठीवरूनी ग बाळ नाहीं हात फिरविला,
घांस नाहीं भरवीला !

नाहीं अक्षर लिहून दिलं कधीं पाटीवर,
गाणं कुठलं ग तर !
नाहीं लाडकीला माझ्या कधीं अशी वाढविली,
भाग्य नव्हतं कपाळीं ! २

पण रागावूं तूं नको, बाळ, आजवरी कांहीं—
उणं पडलं ग नाहीं.
तुझे काका, तुझी आजी, तुझी माई, तुझे तात—
तुला पोटीशिं घेतात.
काय करील यापरीस, ग, आई आणिक तें;
बाळ माझी माणिक तें !
जाणार तूं पण, बाई, आज तुझ्या खऱ्या घरीं,
बोलायास आलें तरी. ३

पण बोलवेना ! काय सांगूं तुला दोन गोष्टी ?
मायेपोटीं येती ओठीं !
जा जा हसऱ्या मुखानं, मागं वळून पहात,
बाळ, आपूल्या घरांत.
माझ्या मायवडिलांचे, सासूबाईमामंजींचे—
आणि तुझ्या वडिलांचे—
थोर पाठीशी ठेवीतें, बाळ, तुझ्या मी संस्कार,
रडूं नको, धीर धर. . ४

चाल माझ्या तूं चालीनं बोल तातांच्या बोलानं,
आणि पतीच्या तोलानं.
झेल आजोळीची अंतरङ्गीं, बाई, भावगङ्गा,
तेज येईल ग अङ्गा.

आण गोडवा तूं संसाराला तुझ्या गोडव्यानं,
गोड होवो तुझं जिणं.
उजळाया कुळं सारीं तुला लाभेल पुण्याई,
पतिघरंची, ग बाई ! ५

कृष्णाबाई माझी आज मिळे गडे सागराला,
कमल वा वसन्ताला !
विकासतां कमल हें गन्ध दूर दर्वळेल,
नांवलौकिक होईल.
माझा अन्तरात्मा जाईल, ग, भरूनिया त्यानं,
जीवा त्यानं समाधान !
ऊठ, घेई त्यांचा हात, भिऊं नको मुळीं, बाई !
पाठीशीं मी आहें आई ! ६

शुभ मङ्गल ! मङ्गल ! सावधान ! सावधान !
बोलतें मी आई जाण.

१८ मे, ३८
पुणें

## ४ मातृहृदय !

[ **भूमिका** : आईनं बाळाकरितां केलेला स्वार्थत्याग अद्वितीय असतो. आपल्या गोड सङ्गीतानं जगाला मोहनी घालणारी एक ध्येयवादी आई आपल्या बाळाच्या दुःखासाठीं काय करणार नाहीं ! ]

[ जाति : दिण्डी

किती होती कण्ठांत तिच्या गोडी !
किती भावस्वरजादु जीव ओढी !
तिची सहजस्फुट ऐकुनी लकेर,
रसिक पर्युत्सुक होय हृदीं फार ! १

फिका वीणाझङ्कार गमे काना,
व्यर्थ बीनाच्या कोमलाङ्ग ताना ;
मधुर नाजुक जलतरङ्गांत नाहीं—
अशी आलापीं फिरत तिच्या राही. २

तिनें गानें संसार गोड केला ;
तिच्या आलापें दुक्खभाग गेला ;
हसुन अङ्गाई बाळकास गाई,
सदा गुङ्गत झोपून तोहि जाई. ३

कधीं रोग्याला ऐकवून गाणीं,—
हृदय फुलवी ती निरामय सुरांनीं.
तिनें भरलें सङ्गीत भोंवतालें,
तिचें गाणें रसरूपगन्ध झालें ! ४

२

तिच्या बाळें अनुकरण तिचें केलें,
लोक आलापीं मोहुनीच गेले ;
याच आनन्दें विस्मरून भान,
कधीं घेई ती गोड गोड तान. ५

" सुदैवानें आपणां लाभलेलें—
असें बाळाला आपल्या दिलेलें ;
गुणोत्कर्षें तो चालवील नांव,
अन्तरींचा पटवील जना भाव ! ६

म्हणुन ओजस्वी मधुर वीरगाणीं,
जना देइल तो प्रेरणा सुरांनीं ;
आणि होउन सञ्चार भावनेचा,
भारताच्या ये दिवस मुक्ततेचा !–" ७

असें पुढती ती स्वप्न मधुर पाहे,
आणि शिकवण बाळास देत राहे ;
तिचें स्फूर्तिप्रद गान पडो कानीं,
म्हणुन फिरती जन त्याच वीथिकांनीं ! ८

३

परी ठरलें हें क्षणिक सौख्य सारें !
बाळकण्ठाला घेरिलें विकारें !
अन्न तुटलें घोटे न जरा पाणी !
हाय ! जाऊं लागली खोल वाणी !! ९

कृशाङ्गाला मग शक्ति आणण्याला,
तिनें अपुलें घातलें रक्त त्याला !
मायभावें उपचार सर्व झाले,
कलाशास्त्रांचे यत्नही निमाले ! १०

पुढें रुग्णालयिं वैद्यराजयानें—
शस्त्र चालविलें कुशल मृदु करानें ;
क्रिया कण्ठावर यशस्वी जहाली,
परी वाचा सोडून त्यास गेली ! ११

जीव जगला, पण लकेरी निमाली !
माय कायमची खिन्नवदन झाली !
बोल नाहीं काढिला बालकानें !
पुन्हा न कधीं गाइलें तिनें गाणें !! १२

३० ऑक्टोबर, ३५
पुणें

## ५ गानचातुरी

[ **भूमिका** : आईच्या हातांत नि आवाजांत अशी काय जादू भरलेली असते, कीं ताईनं आपल्या हातनं निजूं नये, नि आईच्या नुसत्या एका झोक्यानं नि लकेरिनं निजावं ! थोरपणीं होणारी याची आठवण किती गोड असते ! ]

[ जाति : शुभवदना

घुमति तुझे स्वर मञ्जुळ करुण किती कानीं,
हुरहुरतें मन वेडें त्याच कसें ध्यानीं ! ॥ ध्रु० ॥

अन्धारुन वाड्यामधिं चहुकडून आलें,
मिणमिणतें तेज जरा माजघरीं ठेलें ;
खळखळ करि झोपेला आलेली ताई,
सान्जवात ती न तुला पुरती करुं देई ;
पाळण्यांत घालुनि तिज जोजविसीं गानीं ! १

वर खालीं भावमधुर सूर तुझा जाई,
करकरुनी ताल तया पाळणाहि देई ;
जादूची मोहनीच पसरुनिया भोंतीं,
गुङ्गाया हळु लागे कण्हत बाळ तों ती ;
गोड तरङ्गांत निजे मधुरमीलनांनीं ! २

काढुनि हलकेंच हात पाळण्यावरूनी,
बघसि गानचातुरीच आपुली दुरूनी ;
हासुनि घरवात करायास आंत जाशी,
आणि उभा मी तसाच एक जिन्यापाशीं !
हाय ! काय, कधिं फिरेन त्या जीवनयानीं ? ३

२९ डिसेम्बर, ३४
पुणें

## ६ आई ! आई !

[ भूमिका : मुलांचीं दुखणीं शारीरिक तशीं कधी कधी मानसिक हि असतात. शारीरिक दुखणीं वैद्य बरीं करूं शकतात ; पण मानसिक दुखणी बरीं करणारा वैद्य कोण ? ]

[ जाति : दिण्डी

पडे अवशीं तो जरा कणकणून,
भरे मध्यान्हिस ताप फणफणून !
आग लागे अङ्गास तया वाटे.
तिच्या हृदया बोचले तोंच कांटे. १

तडफडूनी तो लागला कण्हाया,
'आइ, आई !' अन्, मधूनिच म्हणाया ;
'सासुबाई किति दूर,' कळुन आलें,
तिचें व्यथित, व्याकूळ हृदय, झालें ! २

करी धीरें परि औषधोपचार,
मायसेवा अन् पडाया उतार ;
डाक्तरानें श्रम घेतले कसून,
तिनें दिनरात्री काढिल्या बसून. ३

"तार जाउन जाहले दिवस तीन !
कधीं येतिल त्या ! ताप ही कमी न !"
भीत बोले ती, तोंच 'आइ, आई !'
पुन्हा कण्हला तो ; श्रमुन तीहि जाई ! ४

डाक्तरानें उपचार पुन्हा केले ;
पुन्हा सेवेनें तिनें सौख्यवीलें ;
परी दुखण्याचा मागला न पाय,
करायाचा नच राहिला उपाय ! ५

पुन्हा कण्हला, होऊन नयन ओले,
' आइ, आई ! ' — तों पुढिल दार खोलें,
आणि आई ये गोन्जरावयाला ;
हात पाठीवर—ताप तों पळाला ! ६

६ जुलै, ४१
विश्रामबाग, साङ्गली

## ७ सञ्जीवनी

[ भूमिका : प्रेयसी हीच जीवनांतील सञ्जीवनी नाहीं का ? ]

[ गज्जल : पाण्डव, सुनीत

तूंच केली जीवितीं गे अमृताची शिम्पणी,
लोपल्या आशेस माझ्या लाभली सञ्जीवनी !
भाव होते मूक तुझे आणि माझे अन्तरीं,
वेदना साहून त्याच्या मूक चाले सन्चणी.
सोङ्ग सम्पादावयाला बोललों ना त्यांतलें,
बोलले गेले परन्तू भाव सारे लोचनीं.
टाळलें भेटावयाचें संयमूनी मानसा,
भावले निःश्वास कोठें तों अकस्मात् दर्शनीं !
दाटला अन्धार सारा वेढुनीया अन्तरा,
मेघमाला कोन्दल्या व्यापून माझ्या जीवनीं.
होउनी गे ! तूं, परन्तू, चन्द्रिका तेजस्विनी,
शान्त केलें तप्त जीवा, तूंच धारावर्षणीं.

होउं दे वर्षाव आतां, झोत ऐसा वाहुं दे,
प्रेरणा तूं जीविताची, पूर्तता सञ्जीवनी.

८ ऑक्टोबर, ३४
पुणें

## ८ विसङ्गति !

[ भूमिका : प्रेयसीच्या ठिकाणी कधीं कधी विसङ्गति कां दिसते ? ]

[ जाति : साकी, सुनीत

ओठाजवळीं आला होता सुधारसाचा पेला,
अजाणतां तूं निष्ठुर हातें दूर परी तो केला !
त्या गोडीचें निर्मळभावें तुवां गाइलें गीत,
आणि तियेला उपेक्षिलें तूं; रीत किती विपरीत !
सरस्वतीची पूजा न तुझी भावसुमांची चुकली,
श्री-विभवाला भाळुन जातां, लहर परी तव झुकली !
ज्या स्नेहाचा तुवां लावला हृदयीं नन्दादीप
तोडुन त्याची धार, पोपिले लक्ष्मीपूजन दीप !
किंवा राहुन करीं शिम्पला मौक्तिक खालीं गळलें ?
हिणकस किंवा हेम अग्निच्या दीप्तीलाहि न कळलें ?
हंसक्षीरन्यायचतुर तूं अखेर पाणी वरिलें !
विसङ्गतींनीं भावशील तव हृदय असें कीं भरलें ?

अनुभव देइल जेव्हां परि तुज शुद्धाशुद्ध ज्ञान
'हृदयीं माझ्या अमृत भरलें तुझ्याचसाठीं' जाण.

१२ एप्रिल, १९३७
पुणें

# ९ सुखद भाव

[ **भूमिका :** प्रेयसीच्या मोहिनींत अहोरात्र जीवन व्यापून टाकणारं असं काय असतं ? ]

[ जाति : स्वर्गदेवता

घातलीस मोहिनी । या जिवास निशिदिनीं ॥ ध्रु० ॥
पश्चिमेस सान्जलें,
रुचिर रङ्ग बहरले,
ओढिते सुरम्य गोड जादु काय त्यांतुनी ? १

नील तारकाङ्गणीं—
शुभ्र चान्दणी कुणी,
लोचनास भारिते वरून काय हासुनी ? २

अमृतवर्षिणी कला—
साण्डते धरातलां,
मधुर शान्ति गुङ्गवी हळूच कीं तियेंतुनी ? ३

अरुणराग रङ्गतां,
उषामुखीं तरङ्गतां,
स्निग्ध काय लाजरी प्रभाच जाय वेधुनी ? ४

रविकरांतलें सुवर्ण—
खुलवितात पुष्पपर्ण,
सुखद भाव त्यांतला जिवास जाय व्यापुनी ? ५

२६ ऑगस्ट, ३५
पुणें

## १० ताजमहाल कीं शान्तिस्थान ?

[ **भूमिका :** ताजमहालपेक्षांहि अधिक सुन्दर असं जगांत कांहीं असूं शकेल का ? ]

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित, सुनीत

तेजें रङ्गविते मनोहर उषा नीलाम्बरा आरुण,
तेव्हां ताजमहाल मोहक दिसे आरक्त शोभे छटा ;
सोनेरी जरतार रम्य यमुना डौलामधें नेसतां,
त्याचें तेज उचम्बळून किरणीं जातें किती साण्डुन ;

दे चण्डांशु कणीं कणीं प्रखरता सोडून विश्वावरी,
येती दिव्य झळाळ आंतुनि किती ? ये मन्दिरा रम्यता ;
सन्ध्येनें हसरी खुलावट, पुढें ये कृष्ण गम्भीरता ;
शान्तिस्थान हिमाचलांतील गमे तो चन्द्रिकेभीतरीं !

अश्रूंनीं भिजवून भाव अपुले तेव्हां मनोमन्दिर—
प्रीतीनें हृदयीं, परी, उभविलें सौन्दर्यशाली किती !
दैवाची पडतां सुढाळ किरणें त्याच्यावरी आगळी,
तेजस्वी दिसते मनोहर किती त्याची स्वरूपावली !
वाढे सुन्दरता अहर्निश, जया स्पर्शी न काळाकृती,
शान्तिस्थान असेल शाश्वत दुजें याहून का सुन्दर ?

२८ ऑगस्ट, ३५
पुणें

## ११ सङ्गम

[ **भूमिका :** प्रेमिकानं कितीहि अढी धरली, तरी शेवटीं प्रेमच बलवत्तर ठरत नाही का ? ]

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित, सुनीत

रागावें मन, तूं विधान भलतें पत्रांत केल्यावर
पेटे डोम्ब मनीं, उफाळुन वरी ये आग तों आंतली !
कैसें मीं पटवून शुद्ध अपुलें द्यावें तुला अन्तर !
उद्वेगांत अशा, अशान्त हृदयीं तों धूम गे ! मातली !
अन्तर्भाव तुला कथीन जर मी पत्रांत आलेखुन,
झाली दूषित दृष्टि, पाहिल कशी निर्भेळ सत्यास ती !
साङ्गावें न तुला मुळींच कधिंही वा मूक मी राहुन,
'वाढे काय अढी ? फुगेल सरिता ?'–चिन्ता अशा ग्रासती !
भेटावें तुज जाउनी झडकरी साङ्गावया हृद्व्यथा,
अन्याय–स्मृतिनें मनीं उपजते माझ्या अहन्ता, तर;
किंवा 'घोर वचें मनें विमुखतीं,'–भीती गमे,–'सर्वथा !'
लाटांनीं असल्या प्रचण्ड हलतो हेलावतो सागर !

येतां तूं पण अङ्गणीं अवचितां, कण्ठीं पडूनी मिठी,
ध्यानीं ये न, कशीं दिठींत विरली पाणावलेली दिठी !

४ मार्च, १९४३
विश्रामबाग, साङ्गली

## १२ रातराणी

[ **भूमिका :** प्रेयसीनं भेट म्हणून दिलेलं नि आपल्या दारांत फुलोऱ्यानं डवरलेलं रातराणीचं रोप म्हणजे तिच्या प्रीतीचंच प्रतीक नाहीं का ? चान्दण्या रात्रीं त्याचा सुगन्ध दरवळला, कीं आपलं मन किती वेधतं ! ]

[ छन्द : स्मर

तुझी रातराणी माझ्या फुलली ग दारीं ॥ ध्रु० ॥

वाऱ्यावर येतां गन्ध,
उन्मादक हो आनन्द ;
फुलोरुनी कन्द कन्द,
दरवळे कोनाकोनीं लाट चित्तहारी ! १

तियेवरी तरङ्गूनी,
ओढ आंतली लागूनी,
परिसरीं रेङ्गाळूनी,
डवरली पाहे तुझी वेल ग बहारीं ! २

चान्दण्याचें स्नान मुग्ध—
अन्तरङ्ग करी क्षुब्ध ;
फुलोरा हा करी लुब्ध,
सुवासांत पोहताहे जीव ग विहारी ! ३

तुझ्या स्मिताचा फुलोरा,
तुझ्या स्वरांच्या लकेरा,
तुझ्या गुणांचा फवारा,
किती गोड मोहरून, भरी सृष्टि सारी ! ४

मोहक ही तुझी कला,—
बन्दीवान करी मला;
जीव हीस लोभावला,
गुङ्गून मी पडतों या तरी कारागारीं. ५

२६ ऑगस्ट, ४१
विश्रामबाग, साङ्गली

## १३ सुखी संसार

[ **भूमिका :** सर्वस्वी सुखी संसार केलेल्या जीवनाचा आढावा गोडच असणार. ]

[ छन्द : नववधू

तुझी माझी जन्माचीच जोडी,
आली संसारीं अथाङ्ग गोडी ग. ॥ ध्रु० ॥

भरदार नवतींत् केला शिणगार भरून,
डोळे निवविले अेकमेकां बघून,
लागुन जिवाच्या आंतल्या ओढी, ग. १

आलीं वावटळें! ऊन कडकलें!!
शिणगार मोडून छायाघर केलें;
त्यागासाठींच लागून होडी, ग. २

गरीबीचा थाट, समाधान दाट,
शिळी कोरडी भाकर, पाणी, मीठ,
कोरड्यास ओठाच्या ग फोडी, ग. ३

पोरंबाळं गुणी झाल्या हिरेखाणी,
किलबिल घरीं झालीं गोड गाणीं,
सूर आपुल्या तारांना जोडी, ग. ४

घाम गाळूनिया शेत पिकविलें,
मळे तरारले, घर उजविलें;
सोडवीलीं जिवाचीं ग कोडीं, ग. ५

गेलों गोड झुरून एकमेकां स्मरून ;
पोराबाळांच्या गोड सपनांत विरून ;
कोण आता ग आपणां तोडी ग ? ६

३१ मे, ४२
विश्रामबाग, साङ्गली

## १४ स्नेहदीपिके !

[ **भूमिका :** प्रेमसिद्धीनन्तर प्रेमसफलतेला अकारण फार विलम्ब लागणं म्हणजे एक प्रकारची प्रेमनिराशाच. अशी प्रेमनिराशा झाल्यावर कर्तव्याच्या मार्गानं पुढं चालू लागलेला नायक प्रेमवस्तूचा पुनर्लाभहि धीरोदात्त मनानं असाच परत करील. ]

[ जाति : मोहिनी

नको मोहिनी तूं टाकूं अशी आज, माई !
थरकतों मनीं, कीं चुकुनी भुलुनि हृदय जाई ॥ ध्रु० ॥

चुकुन भेटलों अन् झाल्या तदा दृष्टिभेटी ;
स्फुरण बोलण्याचें किंचित् मोहरेच ओठीं;
पाउलेंहि वळुनी भिडल्या पुन्हा स्नेहदृष्टी;
परी दुरावी गे ! पहिल्या भीतिची नवाई ! १

चान्दणें तुझ्या स्नेहाचें लाभलें जिवाला;
कथुनि कहाणी अपुलाली फुलविलें मनाला;
संयमांत उत्कटतेचा लाभ किती झाला !
करुण भाल सौभाग्याचा भावि काल पाही ! २

स्वप्न मधुर पाहत गेलों तरङ्गुनी दूर ;
भावमाधुरीनें ठेलों अन्तरीं अदूर;
जिववुनी जिवाला राही अेक भावसूर;
हाय ! बीन एकाएकी मुग्ध कसा होई !! ३

ठरे मायवडिलांची गे ! तुझी थोर माय !
प्रीतवेल पालवलेली सुकुन कशी जाय !

पुनःपुन्हा आले मार्गीं नवे अन्तराय !
माळरान भूमी झाली जीवनाविणें ही !! ४

अन्धकार भरला मागें, पुढें घोर दाट !
ढगाआड झाली तारा, दिसेनाच वाट !
ठेचकाळुनी चालावें किती दरेघाट !
ज्योत अेक पेटवुनी मी घे, बघून खाई ! ५

स्नेहभाव ओपुन, तिजला तेवती करून,
स्नेहदीपिके ! मज जाणें पुढें हुरहुरून !
तेज तूं अम्हांवर फेकी, तारके ! वरून;
नभांतली तूं; इथला मी, परी तुझा भाई ! ६

६ फेब्रुवारी, ४३
विश्रामबाग, साङ्गली

## १५ ग्रन्थ

[ जाति : साकी

ग्रन्थ आपुला केवळ म्हणजे अन्तर्दर्शी ऐना,
मूक आंतल्या भावांची वा पोपटपक्षी मैना.

*           *           *

लेखन म्हणजे जणुं टाकीचे नाजुक सुन्दर घाव,
ग्रन्थमूर्तिवर वठती त्यानें विविध, हृदींचे भाव.

*           *           *

ग्रन्थ आपुल्या अन्तःसौन्दर्याचा ताजमहाल,
सत्य-शिवाचें अथवा शाश्वत दीपगृहच विशाल.

*           *           *

ग्रन्थ आपुल्या चिर संस्कृतिचें अमोल भाण्डागार,
पुरोगतीचा सागर वा नव देई मुक्ताहार.

*           *           *

ग्रन्थ उजळतो मार्ग आपुला फेकुनि तेजःकिरणें,
वाचन म्हणजे प्रियजनसङ्गें विमानांतुनि फिरणें.

*           *           *

ग्रन्थ दूरच्या दोन मनांतिल बिनतारेचें यन्त्र,
सहकम्पानें हृद्भावांचे सुमधुर बोले मन्त्र.

२७ ऑगस्ट, ३५
पुणें

## १६ सुन्दर हिरवे माळ !

[ **भूमिका :** सपाट प्रदेशावरील, उन्हाळयांत धूसर दिसणाऱ्या माळाचं खरं सौन्दर्य वर्षाकालाच्या सरींनी बहराला येतं; त्यांतच डोङ्गर पहाण्यासाठीं आसावलेल्या मनाला दूर दूर नुसता विस्तारच दिसतो, त्यावेळीं काय वाटतं ? ]

[ जाति : कोकिळा

सुन्दर हिरवे माळ ! चहुंकडे सुन्दर हिरवे माळ ! ॥ध्रु० ॥

जमली काळी वर घनमाला,
झिम् झिम् पाउस खालीं आला,
ग्रीष्मर्तूचा ताप निवाला,
कोम्भ येउनी दूर दूरवर पालवलें खडकाळ ! १

बोरवनाचीं सुकलीं पानें,
तरतरलीं या नवजलपानें;
विरळ बाभळी चैतन्यानें,
स्वानन्दानें डुलूं लागल्या सकाळ सायङ्काळ, २

सुकलीं गवतें गोट्यांखालुन,–
हिरवळुनी बघतीं डोकावुन,
रसरसलेल्या तेजें न्हाउन–
मराठमोळा तरुण कुमारी लाजति कीं लडिवाळ ? ३

समोर इकडे तिकडे भंवतीं–
हलूं लागली हिरवी नवती,
ओलसरीनें पानें दंवती,
माळावरल्या वनराणीला नजराणाच सुढाळ. ४

सुकल्या ओढ्यांतुन ही खळखळ—
मुरमाडांतुन करी धांवपळ,
गीतमोहिनी घालुन मञ्जुळ,
हळुच नर्तनी वाजवि अपुलें पायांमधले चाळ ? ५

जोगवलेली गुरें कुणाचीं—
दूरावरुनी जात साञ्जचीं—
अडवित तेजें मावळतीचीं ?
काळ्या छाया सरती एकामागुन एक विशाळ. ६

क्षितिजीं निळसर वाफाऱ्यांचें—
तरङ्गती ढग नव रङ्गाचे;
शिखर न कोठें सह्याद्रीचें,
मात्र एकला जवळ उभा हा ऐटिंत राजमहाल ! ७

निवलीं रानें, गुरें—वांसरें;
निवलीं झाडें रानपाखरें;
धनी अन्तरीं निवले सारे;
शेतकऱ्यांच्या पोटामधला निवेल कधि पण जाळ ? ८

२६ जुलै, ३३
फलटण

## १७ वरले ढग

[ भूमिका : वरल्या ढगांत ओली माया असली तरच खालीं जीवनांत सोनं पिकतं ! आणि तेच ढग शुष्क पाण्ढरे असले तर ? ]

[ जाति : साकी, सुनीत

ऊन कडकतां बैल जोडुनी भू नाङ्गरिली त्यानें,
मृगवर्षावें मवारतां ती पेरी तींत बियाणें.
भाङ्गलुनी तण काढी मधलें येतां हिरवळ वरती,
कीड न लागूं देइ तयाला दृष्टी त्याची फिरती.
कुम्पण घालुनि राखण करि तो रान्त्रदिन जागून,
शीण न मानी कधीं कशाचा जाय जरी भागून.
ओढ बैसली वरली, नाहीं पुन्हा वरसलें पाणी;
गुरें मारिली तरि मोटेवर त्यानें केविलवाणी !
जिवापलिकडे परन्तु जपलीं शिवारांतली ताटें,
' पिकेल सोनें ' म्हणुनी भरले पोटामाजी कांटे.
ओढ बैसतां वरली गेल्या हाय आटुनी विहिरी,
करपुन गेलीं पिकें ! लोपलीं शोभा पहिली गहिरी !

दृश्य न बघवे म्हणुन फेकिली दृष्टि जरा मी भंवती,
ओल्या मायेवीण करपली दिसली सारी नवती !!

१६ सेप्टेम्बर, ४०
विश्रामबाग, साङ्गली

## १८ कोकिळे !

[ जाति : गोविन्द

कोकिळे, मोहवि गे न मला ॥ ध्रु० ॥

छायेंतुन तव सुस्वर ऐकुन फिरलों मागें मागें,
मम आशेला परी लाभल्या केवळ रानझळा ! १

भावभुकेली तूं, हा हृदया भास क्षणभर झाला,
फोल कल्पना ! स्नेहाचा परि गन्धही न तुजला ! २

करिशि वसन्तासाठीं ना तूं पञ्चमांत आळवणी ?
वसन्त भंवती मूर्त रङ्गतां कां न जीव शमला ? ३

नवल न परि हें, तुवां गिरविली सामान्यांची रीती ;
आप्तेष्टांची वा मायावी शिकलिस चतुर कला ? ४

स्वार्थवृत्ति तव जाणुन ही, मम हृदय ओढतें गानें ;
स्वर आतां पण दुरून ऐकुन, फुलविन जीवदलां ! ५

२९ ऑक्टोबर, ३५
पुणें

# १९ शरगङ्गेवरील वाऱ्यास—

[ जाति : मनमोहन

किती झुळझुळ तव ही करी, समीरा! थकल्या जीवा शान्त! ।।ध्रु०।।
ऊन कडके मोवताली,
सोसवेना ही कहाली;
सुखशीतळ विंझण मिळतां हरते बाह्यान्तरिची भ्रान्त! १

माधवी ही पर्णराजी,
जाय कोमेजून आजी,
तव मृदुल करांतच जीवन त्यांना लाभे मधुर नितान्त! २

माळगवतीं खेळलेली,
तरतरी ती हाय! गेली!
चैतन्य तयावर तव सहवासें खेळे किति नवकान्त! ३

गान गाई खळखळूनी,
शुष्क होई तीच तटिनी;
परि पुलकित होई स्पर्शानें तव पल्वलमाला श्रान्त! ४

मूक झालीं पाखरें हीं—
त्रस्त अपुल्या शून्य गेहीं!
तव झुळुकीवर तीं स्वरलहरीनें तरङ्गतीं निभ्रान्त. ५

मृगजळानें भुलविलेली,
चरणशीर्षी भाजलेली,
हीं तृषार्त सारीं श्वसनाचें तव करिती पान निवान्त! ६

मित्र न कधीं तप्त होई,
ग्रीष्मऋतुची कारवाई !
वर्षा हि न येई ! ये, ये तोंवर टाळाया कल्पान्त ! ७

२० मार्च, १९३४
पुणें

## २० बालनिर्झरास—

[ जाति : मनमोहन

जा हासत खेळत बालनिर्झरा आनन्दानें गात ॥ ध्रु० ॥

खडकाळींतुनि जन्माला,
तव ओघ असे हा आला;
या कडेकपारीं, धावत जातां, देतिल तुजला हात. १

ही गर्द तरूची छाया,
करिते बघ तुजवर माया;
ही हिरवळ घेई झेलुनि तुजला सोसुनिया आघात. २

हे गोटे वाटे मधले,
किति सौङ्गडि अडवुन दमले;
परि सुरेल गानीं खळाळुनी तुज देती मञ्जुळ साथ. ३

तुज अचपळ ऐसा बघुनी,
पुष्पें ही लतिकावरूनी,
तुजसवें तरङ्गीं नाचायाला हासुनिया येतात. ४

मोहून तुझ्या द्रुतगतिनें,
गन्धानें, सौन्दर्यानें,
हा खेळाडू ये खेळायाला तव साङ्गातीं वात. ५

पिकवून नवनवीं रानें,
फुलवून नव्या बहरानें,
तूं तरुण सदाचा असा राहसी, पोषुनि भू दिनरात ६

तन गेलें माझें शिणुनी,
मन, सुहृदा ! पण सावरुनी
करि तरुण तयाला, भरुन आपुली प्रसन्नता हृद्यांत. ७

२४ जुलै, ३८
पुणें

## २१ सुरेल गुणगुण !

[ **भूमिका :** सत्तामदाची उन्मत्त अधिकारीवाणी ज्यावेळीं एकसारखी कानावर पडते, त्यावेळीं पोटांत दुब्रळी आग भडकते नि जीवनाचा वीट येतो. अशा वेळीं एकाद्या गोड बालकाची निःशब्द सुरेल गुणगुण, म्हणजे साक्षात् शीतलताच वाटते. ]

[ जाति : गोविन्द

गुणगुण किति ही गोड
सोनुल्या ! गुणगुण किति ही गोड ॥ ध्रु० ॥

उदासलें मन पाहुनि भवती तोण्डपुजी माया;
व्याकुळ हृदया शब्दहीन तव औषध हें बिनतोड. १

शाब्दिक छाया भेवडाविती पुसुनि ध्येयचित्रें;
गुन्तवितां मन कलम कसें मी पुरवु जिवाचे कोड ? २

भाव मधुरता परि तव पाहुनि फुटती पांख मला;
तरङ्गवी मज वर कोठें ती, हृदया लावुनि ओढ. ३

जिववाया मज, मुग्ध गान तव ओठीं पाझरतें;
लकेर कम्पित मुरडत निघते, बीजांतुन कीं मोड ? ४

पिउन तीच मी हृदयामधली शमविन आग जरा;
शब्दहीन पण भावलकेरी अशीच पुढती सोड. ५

२६ मे, ३४
पुणें

## २२ वाऱ्यामागं— !

[ **भूमिका :** पक्षी आपल्या पिलांची काळजी त्यांच्या जन्मापूर्वीपासून वहातात, त्यांचं प्रेमानं सङ्गोपन करतात, त्यांना वाढवितात नि काय काय शिकवितात. पण शेवटीं–? आपलं जीवन तरी तसंच नाहीं का ?]

[ छन्द : ओवी

पक्षीण :—

"कण कण मऊ माती, वाळू चोचींत आणून
पाया घाली घरट्याचा, सान्दडींत पसरून.
धागे पिंगट काथ्यांचे, दोरे मळक्या चिन्ध्यांचे,
काडीकाडींतून गुन्तवीले, विणून गालीचे.
गुन्तवळ मिळवून 'प्रभा-माई'च्या केसांची
बिछायत अन्थरली, गादी कशास पराची ?
केलं हवाशीर घरकुल, दारं केलीं बन्द,
कडेकोट राजवाडा-काय साङ्गू तो आनन्द ?"

"उबविलीं कवटीं मीं मऊमऊ गादीवरी.
गेले बुलबुल माझे, चारा आणाया बाहेरी.
केली राखण, होऊन त्यांनीं कधीं किल्लेदार,
चोंच भरून आणिले घास मींही कधीं चार.
जोगविलं एकमेकां जीव अन्तरीं लावून,
चोंच घालून चोचींत, कधीं पङ्खांत घेऊन.
आणि बाई, एक दिनीं कवटींतूनि ये चोंच !
सुख लाभे जीवनाचं, शहारलं अङ्गीं तोंच !"

" लिवलिवित कणिक मऊ बाळाचं या अङ्ग;
बिलगतां ऊचम्बळे कशानंसं अन्तरङ्ग!
कधीं घेतलं पोटीशीं, चोंच घालून चोंचींत
कधीं मानेवरी मान कधीं घेऊन कुशींत!
कण कण चारीयेलें आन्धळयांच्या लाल मुखीं;
वाढू लागलीं चिमणीं माझीं, बाई, झालें सुखी.
आणि बसून बाजूच्या नळावर, तारेवर,
थरकांपत पहारा करी, येतां पोरंथोरं!"

" पङ्ख फुटले नाजुक उघडले बाई डोळे,
तेज बघूनी त्यांतलं, आइच्या मी सुखीं लोळे.
चिवचिव, किलबिल गोड गोड भरे कानीं,
कवटाळतांना मग माझा ऊर भरे मानी.
घेई पोटीशीं पाखरं, सुखीं डोळे मिटूनीया,
बुलबुल माझे बिलगती! बाई किती माया!
निरखून गेले, आणि कधीं, पिलांस बाहेरी,
किती काळजीनं जपणूक करीती हे घरीं!"

" आणि भरदार होतां, शिकविलं उडायाला,
ऊन-पावसांत खेळ किती सुखवी जीवाला!
कण कण मिळवून कसे टिपून आणावे,
शिकविल बाई, रानींवनीं घेऊनीया सवें,
कधी भरारून एकलींच आणीतातीं चारा,
किती वाटला जीवाला बाई, थोर माझ्या थारा!

आणि हाय! एक दिन वाऱ्यामागं कुठं गेलीं!
आम्ही दोघंच राहिलों-हाय! हाय! घरकुलीं!"

१० एप्रिल, ४१
सोलापूर

## २३ आवाहन

[ **भूमिका :** सर्वत्र सौभाग्यसमृद्धि करणारी नववधु आपल्या घरांत येत आहे ; अशा वेळीं आपण वडिल माणसांनी तिचं स्वागत कशा शब्दांनीं करावं ? ]

[ जाति : मुद्रिका

ये मङ्गलमय विमलते ! उजळ या घरा,
स्वर झङ्कारुन ये वीणे ! शान्तवावया अन्तरा. ॥ ध्रु० ॥

लोटून मार्ग ठेविले,
संमार्जनजळ शिम्पिलें,
राङ्गोळ्या काढुन किती सजविली धरा ! १

सोनेरी उधळुन फुलें,
रविनें हे पथ फुलविले,
हीं यशोधनें त्यावरी विखुरलीं जरा. २

तूं सरस्वती कोमला,
कमलेचें वैभव तुला,
उमळेल तव पदार्पणीं सुखाचा झरा. ३

तव सुस्मित-तेजावली—
सदनांत मधुर फाकली,
तेजाळुन जाइल वस्तु-वस्तुची जरा. ४

तव झङ्काराच्या स्वनें,
मोहरतिल मधुगायनें,
स्वरभाव गोड होईल जिवा आसरा. ५

दृष्टिचें तुझ्या चान्दणें,
सकलांचें होइल जिणें,
फुलतील भाव, येईल बहर परिसरा ! ६

प्रेमाश्रुफुलें हीं करीं,
घेऊन थाम्बलों घरीं,
घरभरणी होतां तुझी, फुले उम्बरा. ७

२० नोव्हेम्बर, ४१
विश्राम-ाग, साङ्गली

*

## २४ कन्याधन देतांना—

[ **भूमिका**: 'कन्या सासुऱ्यासी जाये। मागे परतुनी पाहे!' हें झालं कन्येचं. पण आईबाप अशावेळीं काय म्हणत असतील ? ]

[ जाति: इन्दुकला

शुभमङ्गल, बाले ! बोलतों शुभमङ्गल बाले !
शुभमङ्गल कालीं गोड हें शुभमङ्गल झालें. ध्रु० ||

आजवरी भरले तुझ्या मृदु शब्दांनीं सदन,
आजवरी हसलें हासतां तव सुस्मित वदन.
आजवरी फुललें तुझ्या तें सद्गुण कान्तींनीं,
आजवरी खुललें तुझ्या मधु गायनलहरींनीं.
आजवरी रमलें तुझ्या मन छायेवर सारे,
आजवरी स्थिरले भाव हे तव भावाधारें.
आजवरी, बाले ! आमुचें जीवन हें झालें,
शुभमङ्गल कालीं आणि हें शुभमङ्गल झालें. १

आणि आज बाई ! पातले कोण मण्डपीं हे ?
घर उजळायला न्यावया ये स्वारी, पाहे.
जा करिं कर धरुनी चालुनी सप्तपदीवरुनी,
जा भरल्या ओठीं भराया शब्द नव्या सदनीं.
जा पसरी अपुले भोंवतीं विनयस्मित बाई !
गुणगायनकान्ती हींच गे तेथ तुझी आई,
स्मृतिनीं घर भरलें आमुचे कधि न रितें झालें,
तव घर भरणानें तुझें घर दिसेल भरलेलें ! २

२ मे, ४२
विश्रामबाग, साङ्गली

## २५ स्मृतिनष्ट रामराज्य !

[ जाति : मञ्जरी

सामाज्य केवढें विस्तरलें चहुंकडे,
शोभले किती नद सरिता डोङ्गर, कडे;
किति खेडीं नगरें यांचा गौरव झडे,
प्रेराया हृदयें वरती ध्वज फडफडे ! १

बागडलीं निर्भय हरणें माळावरी,
खिल्लारें चरतां भरली डोंङ्गरदरी;
गोपांची घुमली डगरीवर बांसरी,
मल्लांची इथल्या ये न कुणाला सरी ! २

घोडदौड काढुन वीर इथें चमकले,
समशेरीङ्संग तेजानें तळपले;
भाले न जयांचे शत्रुपुढें वांकले,
स्वातन्त्र्यपवाडे भाटांनीं गाइले ! ३

बुद्धीचे सागर इथले फेसाळले,
अरमार विधर्मी, लाटेनें उलथलें !
लहरीवर त्यांच्या स्वराज्यनौका डुले,
रामराज्य त्यांच्या बळावरी नान्दलें ! ४

परि वक्र न पाही कुणि ज्या भूमण्डळीं,
हा हाय ! तयाची करपे तेज:कळी !
मातींत निमाली आग अन्तरांतली— !
ती फुलेल केव्हां पुन्हा ? कोणत्या स्थळीं ?

२७ ऑक्टोबर, ३६
पुणें,

## २६ उद्याचा हिन्दवी वीर

[ भूमिका : स्वराज्य मिळालं नि हिन्दभूला राष्ट्रसङ्घांत इतरांच्या बरोबरीचं स्थानहि लाभलं. पण हें कसं झालं, अशी शङ्का येतांच, हिन्दभूच्या पाठीशीं उभ्या असणाऱ्या हिन्दवी वीराकडं पाहिलं, म्हणजे सुखस्वप्नांतला तो सुपुत्र कसा दिसेल ? ]

[ वृत्त : सुमन्दारमाला

विकासून हासे किती आननीं ही बलोपासनेची सुतेजावली,
उभा ठाकतां, निर्भयालोचनीं हें तुझें दापितें तेज भूमण्डलीं;
तुझ्या रोमरोमांवरीं आत्मविश्वास हा नाचतांना किती शोभतो,
तुझी हिन्दवी ऐट ही शस्त्रधारी, तुझा धाकही अन्तरा मोहितो.

विराजे स्वसिंहासनीं हिन्दमाता तिथें तूं जरीच्या निशाणासवें—
किती बोलसी बोल आत्मप्रभावी–'नमस्ते, नमस्ते, नमस्ते!' नवे.
दिशांतून, रानीं, वनीं, पत्तनीं ही तुझी नादुनी वैजयी घोषणा,
'स्वदेश, स्वदेशी!' असा एक झाला महामन्त्र राष्ट्रांत तत्पूजना.

तुझी त्यागवृत्ती, तुझें ज्ञान-सामर्थ्य काषाय झेण्ड्यावरी कोरिलें,
भरारून साङ्गे नव्या भारता, तें नवें ध्येय कैसें मनीं बाणलें,
ऋचा जीवनाधार त्या आचरीतां तुझी आर्यतेजें नटे संस्कृती,
उदार ध्वजा ही नव्यांची जुन्यांची स्वधर्मीं किती घालिते सङ्गती!

तुझ्या भाषणांतून ओसण्डती हीं किती साभिमान स्वभाषा-बलें,
जणूं ज्ञानगङ्गा हृदींच्या हिमाद्रींतुनी वाहवीते प्रतापी जलें;
कला, ज्ञान, शास्त्रेतिहास स्वयम्भू जियेमाजिं सम्पन्नता पावलीं,
स्वतन्त्र स्वराज्यांतली प्रेरणा ही परा मार्गदर्शी किती जाहली !

जगन्मान्य राष्ट्रांमध्यें हिंदमाता विराजे, अहा ! आज उच्चासनीं,
तुझें रूप कर्तृत्वशाली पहातां, 'कसें जाहलें हें,' कळे मन्मनीं.

१३ जानेवारी, ४१
विश्रामबाग, साङ्गली

## २७ ॐ शान्तिः शान्तिः !

[ भूमिका : ४ सेप्टेम्बर १९३५ रोजीं राष्ट्रसंघाच्या बैठकींत अबिसीनियाचं भवितव्य ठरायचं होतं नि पृथ्वीवर शान्तता नान्दावयाची होती. बैठक भरली, पण– ]

[ वृत्त : शा. वि., सुनीत

झाले सर्व विराजमान अपुल्या स्थानीं सभामन्दिरीं,
हास्याच्या किरणावली चमकल्या नेत्रांमधें निर्मळ ;
पोशाखी विलसे रुबाब गहिरा, शान्तिप्रभा सोज्वळ ;
शान्तीचीं बिरुदें अलौकिक किती तीं शुभ्र वक्षावरी.

गाणीं सुन्दर मन्त्रबद्ध करिती सर्वांस शान्तिस्वरीं ;
वाहे सात्विक शान्तिभाव हृदयीं, वाक्पाटवीं प्रेमळ ;
शान्तीच्या म्हटल्या ऋचा मधुरवें, शिम्पून शान्तीजळ ;
वाटे ऐकुनि घोष हा अवतरे शान्ती अतां भूवरीं !

आलें झाकळुनी क्षणांत पडला अन्धार चोहीकडे,
व्यापी व्योम विषार धूर मधुनी अग्न्यस्त्रही वर्षलें !

पेटे गांव कुठें, कुठें हबकली खाली विमानावली !
किङ्काळ्यांत कितीक घोर चुरले आकाशभेदी कडे !!
झाले सागर लाल, भूमितळ ही रक्तामधें नाहले !
झाले आणि निवान्त शान्त सगळें ! शान्ती गमे पातली !!

४ सेप्टेम्बर, ३५
पुणें,

## २८ धन्य राष्ट्र !

[ भूमिका : स्वदेशाच्या रक्षणार्थ नि उद्धारार्थ रणतुतारी फुङ्कल्यावर आम्हीं काय केलें पाहिजे ? इतर राष्ट्रांत काय करितात ? ]

[ जाति : पादाकुलक

प्राणस्वर फुङ्कुन जोरानें । गर्जे वीरश्रींत तुतारी,
साथ देउनी पडघम बोले । "चला, सज्ज व्हा करा तयारी !"
आणि सूचना ही युद्धाची । समजुन उठले सैनिक सारे,
सावरुनी शस्त्रास्त्र ठाकले । 'मरुं–मारूं'चें भरुनी वारें. १

मायभूमिच्या प्रतिष्ठेस जे । जुलमी गर्वें देतिल धक्का,
पाताळीं त्या रेचुन खालीं । वदति वाजवूं विजयी डंका.
वीरश्रीनें असल्या भरुनी । तेजस्वी हृदयें तरुणांचीं
देशासाठीं उठलीं सारीं । भीति झुगारुन झणिं मरणाची. २

कुणी पायदळ, कुणी हवाई । आरमार कुणी गांठी झटकन्,
सरबत्तीवर रणगाड्यांच्या । अरि माराया जाई पटकन्,
दारूगोळा कुणी ठासुनी । शत्रुविमानें पाडी वीर,
शहर रक्षणा कुणी राहिले । मायलेकरां देउनि धीर. ३

अनेक यन्त्रालयें आपुलीं । शान्तपणानें करितीं कामें
नव संशोधनिं रतले कोणी । देशांची उच्चारुनि नामें,
कुणी पुत्रिका सेवाधर्म । स्वीकारुन जाहल्या सेविका,
आगीमध्यें कुणी जाउनी । सेविति रणशूरांस बालिका. ४

प्रखर भडकली रणकुण्डाची । आग भयङ्कर जळभूव्योमीं,
पाहुनि सरले सुपुत्र पुढती । उडि घालाया विषार धूमीं.
बालबालिका युवयुवतीजन । मायभूमिच्या जयजयकारें,
आले पुढती प्रेरित होउनि । वीरश्रीच्या नव हुङ्कारें ! ५

बाळगुनीया मातृभूमिची । असीम उत्कट तळमळ पोटीं,
धिमेपणानें करिती सारे । मन्त्र भूमिचा ठेवुनि ओटीं.
धन्य राष्ट्र तें ! धन्य पुत्र ते ! । धन्य पुत्रिका ! धारातीर्थी-
मायभूमिच्या कल्याणास्तव । धावुनि, देती जे आत्माहुति !! ६

१० जुलै, ४१
विश्रामबाग, साङ्गली

## २९ पीक

[ भूमिका : बी पेरणारानं पुढं निष्काळजी राहून कसं चालेल ? तसं झालं तर हाताला मोसम कसला लाभेल ? ]

[ जाति : भूपति

येतांच वाफसा बीज पेरिलें त्यानें,
पाऊस ऊन तें रुजविति वर्षावानें;
हळुहळू दिसाया हिरवळ लागे रानीं,
जोमांत तरारुन वरती आलीं पानें. १

तों कर्षक कोठें झाला दृष्टीआड !
थाम्बून राहते थोडिच त्याची वाढ ?
पात्यास फुटूनी पातीं, फुटले कोम्भ,
पाऊस वर्षुनी तुरेदार हो काड. २

कुळवण नि भाङ्गलण मुळीं जहाली नाहीं,
तण वाढुन गवतीं मोड खुरटले कांहीं ;
कुतऱ्यांचे गवती तुरे उन्चवुन मान–
रविकिरणीं चमचम करिति दिशांना दाही ३

कुतऱ्यांच्या छत्र्या वाढुन कोठें त्यांत–
चमकवुनि चामरें करिती गवता साथ;
भरदार दडपुनी मोड परन्तू गेले
होऊन पिकाचीं साऱ्या वाताहात ! ४

हङ्गाम सम्पतां कर्षक आला रानीं,
कापणी कराया गेला अभिमानांनीं ;
कुतऱ्यांचे गवती तुरे आणखी छत्र्या-
यांचेच लाभले ढीग ! न खाई कोणी ! ! ५

१५ ऑगस्ट, ४२
विश्रामबाग, साङ्गली

## ३० सम्भावना

[ **भूमिका :** " सर्वश्रेठ गायकाला एक हजार रुपये देऊन त्याचा सत्कार करावा " असें दिवङ्गत पित्याचें मत जाहीर झाल्यावर, एका मेळाव्यांत त्याच्या सत्पुत्राला पुढील अनुभव मिळाला. ]

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित

आले गायक त्या सभेंत अपुली साङ्गावया श्रेष्ठता,
आविर्भाव असा दिसे प्रतिमुखीं, कीं श्रेष्ठ तोच स्वतां ;
होते याचक तापले बघुनिया ते एकमेका जरी,
चावूनी अधरोष्ठ मुग्ध बसले अस्वस्थ ते अन्तरीं.

" आहों आपण योग्य एकच कसे सत्कार हा घ्यावया,"
विस्तारें विवरून साङ्गत कुणी, लागे मधें गावया ;
बोले एक " तपैक वेचुन कुठें मी खाकराया शिके ;
अन्यांचें मज वाटतें तरिच हें गाणें सदाचें फिकें."

साङ्गें अन्य " कशीं धुऊन गुरुचीं तस्तें, पदें चेपिलीं "
" पोशाखीं गुरुचीं व्रतें " कुणि कथी, " कैशीं, किती पाळिलीं ! "
वर्णी एक " परम्परा स्वगुरुची कैशी भिडे नारदा ! "
" पाहा हीं बिरुदें नि थोर पदकें " साङ्गे कुणी " एकदा ! "

कोणीं भर्जरि आसनें नि शमले जर्तारिचे दाविले ;
कोणीं " वादनवृन्द गोड अपुला आहे किती ! " वर्णिलें ;
" वाद्याचा किति इन्च घेर अपुल्या " साङ्गून रङ्गे कुणी,
" जिव्हान्दोलन हो किती !" कुणि कथी, "केल्या किती शिष्यिणी!"



४

बोलाया मतभेद लागुन हळू ते एकमेकांतले,
काढूनी रणभेरिचा स्वर पुढें गर्जावया लागले;
झालीं आणि रणें तिथेंच, फुटलीं वाद्यें नि डोकीं किती !
द्याया औषधपाणि त्यांस, सगळा आता निधी वेचिती ! !

१५ मे, ४२
विश्रामबाग, साङ्गली

## ३१ गरिबांची माय !

[ **भूमिका :** विष्णुशास्त्रींनीं निर्माण केलेल्या पुणें न्यू इंग्लिश स्कूलनं अनेकांचं अनेक प्रकारं कल्याण केलं. या पूज्य संस्थेकडं आत्मीयतेनं पहाणाऱ्यास काय वाटेल ? ]

वन्दन तुज आनन्दें करित माउली
स्मरण तुझें स्फूर्ति देइ जीवनांतली ॥ ध्रु० ॥

वाढविसी बालकांस अमृत पाजुनी,
प्रेरणा तुझी अम्हांस एक आंतुनी.
विष्णु, बाळ, माधव, गोपाळ चमकले,
गुरुवर आदर्श थोर तारकांतले.
निःस्वार्थें कूस तुझी धन्य जाहली ! १

बाळ तुझे वीर कुणी दूर गाजले,
मान्य जगीं धीर गुणी कितिक साजले.
राष्ट्रभाव उपजविसीं तूंच अंतरीं,
एकीचा ध्वज फडके हा तुझ्या घरीं;
गरिबांची तूंच एक माय, साउली ! २

२३ फेब्रुवारी, १९३५
पुणें

## ३२ सुधेची झरी

[ **भूमिका :** प्रिय 'फर्ग्युसन' महा विद्यालयाचं नांव निघतांच प्रत्येकाला असंच वाटेल, नाहीं का ? ]

[ जाति : सुनीत

पल्लेदार विशाल पङ्ख तव हे विस्तारले वैभवें,
गेले प्रान्त कितीक दूरवरचे छायेंत सामावुन;
विष्णूपासुन लाभलें अमृत तें चैतन्य तूझें नव,
जागोजाग सुधा तुवां वितरिली द्यायास सञ्जीवन.

स्वातन्त्र्यप्रिय बान्धवांस्तव कुणा दृष्टी नवी तूं दिली,
लाभे स्फूर्ति कुणा भरारिंत तुझ्या विज्ञान--काव्यांन्तरीं;
कोणा निर्भयता पराक्रमवशा स्वक्षात्रवृत्तींतली,
एकीचा जयघोष सक्रिय तुझी सावेश वाणी करी.

थोरी, विक्रम, शील हीं चमकलीं ज्यांची हिऱ्यांच्या परी,
निःस्वार्थी असले महा जन गुरुस्थानीं तुला लाभले;
विष्णू आणिक वैनतेय मिनले द्याया सुधेची झरी,
ऐसें चित्र तुझें, जरा थबकतां दारीं, पुढे रङ्गलें.

झाले सर्व कृतार्थ, फेडुनि तुझी द्रव्याञ्जलींनीं ऋणें;
अर्पूनी परि हे सुवर्ण करितों मी धन्य माझें जिणें!

२३ डिसेंबर, ३४
पुणें

## ३३ स्वर्गीय गङ्गा

[ भूमिका : 'आश्रमा'ची यथार्थ कल्पना आणून देणाऱ्या साङ्गली विलिङ्ग्डन महाविद्यालयास पाहून काय वाटतें ? ]

[ जातिः सुनीत

मोतालीं पसरून पङ्ख हिरवे ही पक्षिणी कां बसे–
चोंचीनें भरवी पिलांस अपुल्या पङ्खामधें घेउनी ?
कीं स्वर्गस्थ कुणी दयार्द्र जननी जन्मान्तरा घेतसे,
मायेचे भरवीत घास बसलीं बाळास गोन्जारुनी ?

येवोनी कुणि देवता वरुनि वा रङ्गीन पङ्खांतरीं–
आणी गोड सुधा, नवीन युवका द्यायास तेजं नव,
कीं तेजोनिधिची मनोमय कुणा स्वप्नावली साजिरी–
होतां पूर्ण तपोबलें, भिजुनि ही झाली असे पार्थिव ?

सन्ध्येची रमणीयता नित खुले कां ना तरी आरुण ?
शेतें हिर्वळुनी नितान्त अपुलें तारुण्य कां दाविती ?
ध्येयांचे उधळून दिव्य फिरती कां हे गुलाबी कण ?
वारे मञ्जुळ भावगीत अपुलें तें तेंच कां गुञ्जती ?

छे ! छे ! जन्हुच हा समर्थ लपवी स्वर्गीय गङ्गा शिरीं
वोसण्डी जिवत्रावयास सकलां ही जान्हवी भूवरी.

२७ ऑगस्ट, ४०
विश्रामबाग, साङ्गली

## ३४ प्रेरक माता

[ भूमिका : डे. ए. सोसायटीच्या 'मुलींची इङ्ग्रजी शाळा' या संस्थेंतील मुली आपल्या शाळेला आत्मीयतेनं कसं अभिवन्दन करतात ? ]

तुज अथाङ्ग डोळे भरून पाहावें, शाळे ।
तुजपुढें नमावें सादर, गे प्रतिपाळे ! ॥ ध्रु० ॥

तूं ध्येयजीवनीं प्रेरक अमची माता,
तूं कर्तृत्वाचें स्फुरण आमुच्या हाता;
तूं विद्यादानीं देसी संस्कृति–ठेवा,
तूं तेज देउनी, फुलविसि हृद्राजीवा;
तूं चैतन्याची मूर्तिमन्त गे खाणी,
तूं अभ्युदयाची, निःश्रेयाची वाणी;
मैत्रेयी, गार्गी, सीता–द्रौपदी,
नव जिजा अहिल्या लक्ष्मी–तव पदीं–
होऊन, दिगन्तीं नेऊं सुयश, कृपाळे !
तुज आणि गुरुजना वन्दितसूं, लडिवाळे !

२२ डिसेम्बर, ४१
विश्रामबाग साङ्गली

# ३५ देवी अहिल्याराणींचें जीवनमन्दिर

[ जाति : प्रणयप्रभा

झळझळतीं कळसावर किरणें !
राउळीं झळकतें धन्य जिणें ! ॥ ध्रु० ॥

पावित्र्याचा, सुसंस्कृतीचा
थोर कुलाच्या कुलीनतेचा,
मायभूमिच्या अभिमानाचा,
पाया भरला वडिलपणें १

सौभाग्याच्या गाभाऱ्यावर—
वीज कडाडे वरुनि भयङ्कर !
शान्तिशलाका परि तव अन्तर—
संरक्षी नव शिल्पकणे ! २

मायभाव तव उभवी मन्दिर ;
औदार्यानें रचिले थर थर,
स्वार्थत्यागें भरुनी अन्तर ;
कळस शोभला नितळ गुणें ! ३

ध्येयदेव जनहृदया कल्पुनि,
मूर्ति पूजिली प्रतिष्ठापुनी—
कर्तव्याच्या गन्धफुलांनीं,
चढवुनि भावांचें लेणें. ४

'सून सुभेदाराची!' –वाणी
पराक्रमाची तुझ्या निशाणी!
'धन्य निरेचें झालें पाणी!'
वदति बोल, हीं शहाजणें. ५

अम्हांस थोडी पुण्य साउली—
तुझी लाभली इथें, माउली!
जीवनमन्दिर तव बलशाली
स्फुरवी तेजाचें गाणें. ६

२९ ऑगस्ट, ४३
विश्रामबाग, साङ्गली

---

१ "मी सुभेदाराची सून आहें!" हें अहिल्यादेवींनीं शिंद्यातर्फे आलेल्या बाळारावास दिलेलें स्वाभिमानी उत्तर.

## ३६ गुरुदेव रवीन्द्र !

[ जाति : मञ्जरी

तुज फुलाफुलांतुन सुगन्ध नव लाभले,
त्यांतून पीक तूं नदितीरीं पिकविलें,
सोनेरी नौकेंतून धरेला दिलें. १

तूं निर्झर--ओढे--महोदधींतिल जल—
निज मन्त्रोच्चारें तीर्थ करुनि मङ्गल
शमाविलें धरेला, होता ती व्याकुल. २

तुज कोमल किरणें सोनेरी गवसली,
मृदु हातें त्यांची विणुनी वसनावली,
हळुवारपणें तूं दीन धरा झाकिली. ३

तव करा लागले दंवबिन्दू हासरे,
तेजाळ बनवुनी त्यांचे माणिकहिरे,
चमकवुनि आपुल्या तूं भूषविलें धरे. ४

तरुडोङ्गरमेघांवरी रङ्ग बहरले,
घेऊन मनोहर कांहीं त्यांच्यांतले,
सौन्दर्ये कोमल देती तव कुन्चले. ५

वाणीस करूनी चन्द्रकळा शीतळ,
वर्षून तियेंतुन भावकिरण निर्मळ,
तूं धरेस दिधलें ध्येय नवें उज्ज्वळ. ६

स्वरभाव कोवळें वेचुन विश्वांतले,
भारतीय वीणेवरी तुवां छेडिले,
अन् 'गीताञ्जलिनें' धरेस या निववलें. ७

जन्मून भारतीं किमया केली तुवां,
तूं गुरुस्थान दाविलें अखिल मानवा,
        गुरुदेवा, यास्तव देते धरणी दुवा. ८

हा हाय ! परी ती गभीर तेजस्विनी,
पाहिली जवळुनी मूर्त अमृतवर्षिणी,
        दिसणार कशी अन् सुधा स्रवे कोठुनी ! ९

३० ऑगस्ट, ४१
विश्रामबाग, साङ्गली

## ३७ कविवर्य भास्करराव ताम्बे

[ छन्द : ओवी

फुलें विकसलीं किती
रानोरानीं रङ्गदार,
तुझें परी भरदार. १

सूर सारङ्गीचे गोड
अन्तराळीं निनादले
परी तुझ्या मोहवीलें. २

किति चमकलें निळें
आकाश हें ताराङ्गणें
तुझें एकच चान्दणें. ३

हृदयास शान्त करी
तुझा ‘ कल्पनीय ’ भाव
कवींतला तूंच राव. ४

२६ नोव्हेम्बर, ३४
पुणें

# ३८ प्रियसुहृद् माधवराव पटवर्धन यांस

[ वृत्त : शा. वि., सुनीत

गेला शेवटल्या सरी वरसुनी वर्षर्तु भूमीवरी,
तेजस्वी रविच्या छटा उफळल्या या सान्ध्य अस्तांतुनी ;
शोभे जाम्भुळकी निळींत पिवळी अन् पोपटी, केशरी,
सोनेरी किरणावली नितळ ये मेघांवरी खालुनी.
शोभे गड्द निळा ‘ पन्हाळगड ’ हा, या पार्श्वभूमीवरी,
काळ्या धूसर सावल्या उतरल्या ‘ विश्रामबागेंतुनी ’;
तेजाचें विलसे सुरम्य हसरें जें बेट दूरावरी—
आकर्षी मजला, कळे न कसली तें ओढणी लावुनी !

नेत्राल्हादक कीं हसे नवनवोन्मेषा तुझी ‘ शारदा ’ ?
किंवा ‘ स्वप्नतरङ्ग ’ हे उमलती त्वद्भावगीतांतले ?
मोही मानस कीं तुझी रसवती ‘ छन्दांतली ’ सम्पदा ?
कीं सौहार्द तुझें वरी उसळुनी आलें, सख्या, आंतलें ?
होता वास तुझा तिथें, म्हणुनि हीं तेजें तुझीं साठलीं,
कीं रूपान्तरिं जीवनार्थ सुहृदा स्नेहार्द्रता ओपिली ?

२९ सेप्टेम्बर, ४१
विश्रामबाग, साङ्गली

# ३९ सेनापतीस

[ **भूमिका** : देशासाठीं प्राणत्याग करण्यास तयार झालेल्या सेनापति पां. म. बापट यांनीं जनतेचा प्रेरक शब्दांनीं निरोप घेतला. त्यावेळीं सेनापतींचं सबन्ध जीवन डोळ्यापुढं उभं राहिलं. काय वाटलं त्या क्षणाला ? ]

[ सुनीत

तेजस्वी तव जीवनें पसरलें चैतन्य राष्ट्रान्तरीं,
क्रान्तीची हृदयांत एक भडके वेगें ज्वलद्‌भावना ;
स्वातन्त्र्यध्वज हा तुझा फडकतां क्षेत्रीं अघाडीवरी,
येती सैनिक हे सहर्ष समरीं, सञ्चारुनी चेतना.
त्यागाचे तव मन्त्र आजवर जे चोहींकडे नादले,
स्फूर्तिप्रेरित त्या ऋचा म्हणत हे तालामधें चालती ;
‘ आत्मत्याग ’ कराल एकच पुरें शस्त्रास्त्र ज्यां वाटलें,
युद्धांचा जयघोष गर्जविल हीं तूझीं दळें हालतीं.
‘ सर्वे सन्तु निरामयाः ’ तव अशी वाणी पवित्रोज्ज्वला-
धूम्राचीं वलयें विषार निरसी व्योमास जीं व्यापितीं ;
राष्ट्राचा इतिहास तूं घडविला ; तूं दावितां या बला,-
शौर्यें धावुनि हे रणांत अपुली देतील रक्ताहुति !

रक्तांतून नवे असङ्ख्य परि या वीराग्रणी जन्मुनी,
स्वातन्त्र्यध्वज ठेवितील तव हा व्योमीं उभा तोलुनी.

१६ जुलै, ३९
पुणें

## ४० सूर्यमालेंतील सूर्य

[ भूमिका : आपल्या प्रिय 'फर्ग्युसन' महाविद्यालयास आपल्या अलौकिक स्वार्थत्यागानें वैभवसम्पन्न करणारे गुरु. र. पु. परान्जपे म्हणजे सूर्यमालेंतील सूर्यच नव्हेत का ? ]

[ सुनीत

शोभावें रविमण्डलांत रविनें कान्ती तुझी त्यापरी,
तेजानें हसऱ्या अपूर्व नटले तूझे ग्रहोपग्रह ;
कोणी विक्रमशील मङ्गल सुधावर्षाव कोणी करी,
तेजें शोभवितीं कुणी बुध गुरु धीमन्त विद्यागृह.

शुक्राची प्रतिभा कुठें विलसते सस्नेह आकर्षुनी,
तेजाचीं वलयें सुरम्य भरितीं सम्पन्नता अम्बरीं ;
तेजस्वी किरणीं तुझ्या चमकली ही पुण्यभू हर्षुनी,
राहूनी स्थिर तूं परां फिरविशी कक्षेंत मन्त्राक्षरीं.

स्वार्थत्याग तुझा अलौकिक ! दिली तेजें जळूनी उरीं,
अन्धारीं किरणें तुवां पुरवुनी दीना दिलीं वैभवें;
विश्वप्रेम, पुरोगतित्व, समता हीं बाणलीं अन्तरीं,
स्थानीं उच्च तुला म्हणून विधिनें संस्थापिलें गौरवें.

व्हावें खिन्न अम्ही कशास विरहें ! तूझीच तेजावली—
आम्हां मित्रपरम्परेंतुन तुझ्या आहे जिथें लाभली !

१० ऑगस्ट, १९३६
पुणें

## ४१ स्मृतिपूजा

[ **भूमिका** : मायभूमीच्या दूरच्या प्रान्तांतून कार्यप्रेमानं येऊन मराठ्यांशीं एकरूप होणाऱ्या कोल्हापूरच्या आर्यसमाजी डॉ. बाळकृष्णांची स्मृतिपूजा अशीच असेल, नाहीं का ?]

[ जाति : प्रणयप्रभा

तुजवरी वाहतों भावफुलें,
वर्षुनी स्मृतींचीं मन्त्रजलें. ॥ ध्रु० ॥

प्रेरक होतां वैदिक वाणी,
आर्यत्वाचीं गाउनि गाणीं,
कृतिची रचिली थोर कहाणी,
भाव जियेंतुन नव उमले. १

मानवतेला अवचित मुकली—
जनता असली हृदयीं धरिली,
शुद्धी, समता तियेंस दिधली,
माणुसकीतें जागविलें ! २

दूर सोडुनी देश आपुला,
मराठियाशीं जिव समरसला,
नव संशोधन कार्यीं रमला,
तेज तुझें त्यांतून खुलें. ३

सम्यक दर्शन शिवरायांचें—
तुवां घडवुनी स्वातन्त्र्याचें,
पोषण केलें तरुण मनांचें,
भविष्य त्यामधुनीच फुलें ! ४

१६ ऑक्टोबर, ४१
विश्रामबाग, साङ्गली

# ४२ दौल्याची दिवाळी !

[ भूमिका : दुष्काळाची भीति वाटणाऱ्या दौल्यानं आपली दिवाळी सुखांत साजरी करण्यासारखं काय घडलं ? ]

[ जाति : दोहा

कोण उभा हा शाळुमधें, वरती लावुन दृष्टी,
गुडघाभर जग भंवतींचें, पाहुन होई कष्टी !
मुण्डासें—मळक्या चिन्ध्या झिळमिळ डोईवरती,
दावि फाटकी पैरण ही पोटभकाळी पुरती !
किती ठिगळलें धोतर हें गांठुन ठायीं ठायीं,
खालुन काळीचे चटके हाय ! न कांहीं पायीं !
येइ अरेरे ! कष्टदशा सकस हाडपेरांना !
काळवण्डलें तोण्ड किती मलूल पाहुनि राना !

डोक्यावर तावुनि गेलें भर बाराचें ऊन !
रानीं तरि खपुनी दौल्या तण काढी खुरपून.
झुन्झुरकाची खाऊनी भाकर आणिक मिरची,
आग शमवि तो पोटाची न्याहारी गरिबीची !
भाङ्गलतांना आणि पुन्हा आग पेटली पोटीं,
खरडुनि हेळामधिं नरटी, लावी दौल्या ओठीं.
आग भडकली आकाशीं जाळ लोटले खालीं,
'करपं शाळू' बघुनि भरे हृदयीं डोम्बकहाली !

"कुटला दसरा अन् कुटली आतां घरीं दिवाळी !
राजा परदान्याला अन् आग अमां ही जाळी !
कारबारिनीला कुटलीं काम्बुरनं मी घ्येवूं ?

पोराबाळांना उगडं वरिसभरी कां पाहूं !
सावकार अन् त्यें सरकार कुटली त्येना माया !
लिलावास काडितील त्ये भाण्डीं, मडकीं, गाया ! "
पाणी पाणी जीवाचें तों भीतीनें झालें,
अङ्गाङ्गांतुन घामाचे लोट निथळुनी आले,
थाम्बुन दौल्या आणि जरा पुन्हा शिवार न्याहाळी,
भविष्य दिसलें कीं त्याला ? पुन्हां आंसवें गाळी ! !

तों धूसरूनी आकाशीं जमले काळे मेघ,
गार हवेंतुन मातींचा येई गन्ध सवेग.
तिरिप नभींची काजळली, ढगाळलेली छाया ;
धो धो हस्ताची वरसे खालीं ओली माया;
लागे दौल्या नाचाया आनन्दानें भिजुनी,
लक्तऱ्यांतुनी ओघळल्या वरल्या धारा अजुनी
कार्भारिण तों शेवन्ती घेउनि येइ शिदोरी
नाचत दौलतरावांची झटकन धावे स्वारी.
घेउन तिज मग साङ्गातीं जरा ओढुनी जवळीं,
घास मुखीं देऊन वदे– " आतां, गडणि, दिवाळी ! "

२ ऑक्टोबर, ४०
विश्रामबाग, साङ्गली

## ४३ बियाणा

[ भूमिका : कृतज्ञतेचं मोल कांहीं आणिक असतं. पण तिचाच अभाव आपल्या उन्नतीला नडत नाहीं का ? ]

[ जाति : साकी

अपहाराला हळुच एकदा अशीच वाचा फुटली,
आणि नोकरी आधाराला होती तीही सुटली !
धडपड केली किती शिद्यानें शहरीं जगण्यासाठीं,
परि भेटाया जावें त्याच्या पडे कपाळा आंठी !
" जिनं आपुलं कुनब्याचं ह्यं। हतं कशापै -हावं ?
धरुनश्येनी कुटं बी नाङ्गुरं खेड्यांतच राबावं !"
बोलत हें, तो बाइल-पोरें पुढें उपाशी पाही,
आणि काढुनी उसनें, रात्रीं नकळत गांवीं जाई.
असेंच घेउन मग खण्डानें तिथें कुणाचें शेत,
अन्तर्यामीं नवे शिद्यानें रचले पुढले बेत.

दुष्काळाचा कहर गुदरला परन्तु एकाएकीं,
आणि साधनासाठीं दृष्टी चिन्तातुर तो फेकी.
आणुन उसना नाङ्गर त्यानें शेत नवें नाङ्गरलें,
आकाश न, पण मानस त्याचें कृष्ण ढगांनीं भरलें !
" धाडस क्येलं अवकाळीं या ! महाग झाला दाना !
कोन आपलं हतं ! कुटूनी आनूं आज बियाना !
पैशाचं बी उसनं द्याया तयार न्हाई कोनी,
कशी कुनाला दावावी ह्यी रिती आपुली गोनी !
भैय्या, शिवबा, रङ्गराव, त्यो वरल्या घरचा राया—!
नांवें सरलीं अनेक पुढुनी परन्तु सारीं वाया !

घाबरलें मन, चिडलें पाहुन व्यवहारी जनरीती,
धाडस केलें भलतें, त्याची मनास वाटे भीती.
तोंच कळें कीं हरग्या अपुला ग्रामोद्धारक वीर,
येरवड्याहुन सुटून आला सत्याग्रहशाहीर.
अमोल आहे नवा बियाणा गांठीं त्याच्या कांहीं,
बाळपणींचा काय सौङ्गडी म्हणे आपणां 'नाहीं!'
भेटुन त्याला रसाळ गोष्टी साङ्गे मागिल चार,
आणि मागणी हळूच करतां, त्यास मिळे 'होकार!'
ढग मावळले मनांतले अन् आकाशांतिल जमले,
येउन शेता नवा वाफसा, त्यांत बियाणें पडलें!

आग भडकली हबसाणीं तों नवयुद्धाची फार,
सुरू जाहला बहुमोलानें धान्याचा व्यापार.
मळणी होउन भली थोरली होय खळ्यावर रास;
चौबाजूंनीं फळास पुरती येइ शिद्याची रास.
काय साङ्गणें, काय वाटलें येतां चौपट मोल!
निघूं लागले त्याच्या भंवतीं स्नेह स्तुतीचे बोल.
ऐकाया हें परन्तु नव्हता हरग्या अपुल्या गांवीं;
हिण्डलग्याला स्तुति जनतेची कैशी ही पोंचावी!
आणि पसारा किती जहाला अवघ्या दो वर्षांत!
चढल्या हर्षावर हर्षाच्या लहरी उत्कर्षांत!

गळितासाठीं शेतांतिल, तो आणि उभारी गिरणी.
मोटारींतुन शिदबा पाटिल करूं लागले फिरणीं.
अशी एकदां कामकऱ्यांना झाली माराहाण,
हरग्या धावुन दीनांसाठीं टाकी जीव गहाण.

चिथावणीचा परन्तु करुनी हरग्यावर आरोप,
येरवड्याला पाठविलें हें फोंफवणारें रोप.
अन् घर-शेतें जप्त जाहलीं दण्ड वसूलीसाठीं,
पदरीं घेउन तीं, शिदबांनीं घट्ट मारल्या गांठी !
आणि बियाणा ?--कसला ? पोरें महाग अन्ना झालीं !
त्याच घरावर उठली आतां शिदबांचीच हवेली ! !

२५ एप्रिल, ३७
सोलापूर

## ४४ अन्याय !

[ भूमिका : अन्याय असे जोंवर अन्यास जहाला । तो प्रश्न कशाला ?]
—माधव जूलियन

[ जाति : साकी

पाटिल मोठे दहा गांवचे असले गणबा थोर,
करितिल शेती कशी एकले, नसतां दुसरा जोर !
त्यांत पुढारी खण्डकऱ्यांचा आज सोडुनी गेला,
मलूल वदनीं कसा गुलाबी यावा आज तजेला ?
कपाळास ते लाउन बसले सचिन्त अपुला हात,
भाविकालच्या शेतीचें निज भेसुर चित्र पहात !
" भिवा आवरिल का ही शेती, टाकिलाच जर भार ?"
प्रश्न चमकला, अन् भाळींचे ढग मावळले पार.
उल्हासाच्या उकळीसरसें त्यास निमन्त्रण गेलें ;
वळवानें जणुं तप्त बिध्याला नवे वाफसे आले.

साखरगांवाहून भिवा ये गांवीं अपुल्या थेट,
नव आशेनें गणबांची तो जाय घ्यावया भेट.
स्वप्न मनोरम पुढलें दिसलें त्यास मनोमय गोड,
उचली पाउल झरझर, लागुनी नव शेतीची ओढ.
गणबांनींही स्वागत केलें कळकळ दाउनि मोठी.
आपुलकीनें खण्डकऱ्याची गोष्ट ठेउनी पोटीं.
" भिवबा, अमुची शेती मोठी, शम्भर एकर डाग, !
कां म्हुन जानं साकरगांवा तुला पडावं भाग ?
खण्डकरी तूं उमदा, अन् ह्यें तुजं न्हआतं गांव,
साकरगांवीं ऊंस कराया कां म्हुन् अतां रहावं ?

यापरि पेरुन साखर, त्याला वैभव दाउन मोठें,
अङ्गण परदेशी करण्याचे पुरे पटविले तोटे.
कर्तृत्वाला वाव पाहुनी, धरुनी आशा भावी,
सोडुनि आला सेवा तेथिल भिवा आपुल्या गावीं.
लौकिक मोठा असे भिवाचा शेतींतिल कामाचा,
म्हणुन त्याकडे ओढा वाहे सन्तत ज्याचा त्याचा.
लागवडीचें पाहुन, गणबा, भिवबाचें नैपुण्य–
म्हणती–"आपण यास जोडुनीं आज जोडिलें पुण्य!"
करारनामा करुनि निरविली शेती त्याच्या हातीं;
लोक बोलले "पिकविल आतां सोनें, त्यांची माती."

वर्ष लोटलें मळे तयांचे नीट लाउनी झाले,
आणि डवरुनी तिसऱ्या वर्षीं ते बहराया आले.
माण्डवावरी फोफाऊनी चढले अङ्गुर वेल,
मोसम्ब्यांची लगडायाला बाग न लागे वेळ.
फुलबागेचा फुले फुलोरा, दरवळुनीया रानीं,
वाफ्यामधला भाजीपाला भरला फळभारांनीं.
वैभव असलें आणि पिकांची बघुनी सुन्दर लानी,
गणबादारीं द्रव्य ओतलें खळखळ व्यापाऱ्यांनीं;
जो तो असली अनुपम शेती, पहावयाला धावे,
नवल न, शेजारी जर जळले वैषम्याच्या भावें!

आणि एक दिन शेजारांतिल खण्डकरी रङ्ग्यानें—
खण्ड उडविले, कोल्हाटणिच्या मोहुनिया नादानें!
धनी बुडाला, येतां त्याच्या 'ख्यालीस' महापूर,
म्हणुनि तयाला कामावरुनी केलें त्यानें दूर!

आणि दिवाळें काढुनि आला व्यसनसखा हा दीन,
गणबांना ये कींव तयाची, होतां पायीं लीन.
आधारास्तव थेट घराची अपुल्या धरली वाट,"
म्हणून गणबा म्हणती " कांढू यांतुन कांहीं वाट.
शेजाऱ्यावर सूड घ्यावया साधन चालुन आलें,
हातीं धरूनी घरभेद्यास, न कोण उभारी भाले ?

" प्रमुख जाहला खण्डकरी तो,–भिवबा हाताखालीं ! "
वार्तेनें या भिवबाची तर लाही लाही झाली !
" छान फळाला आली," बोले, "केलीली पुण्याई ' !
डोम कावळा ह्यो, ह्ये अम्च्या धन्यास म्हाइत न्हाई ? "
दैवच फिरलें आणि तयाच्या सासुरवासाखालीं—
बुद्धि आपली राबविण्याचें आलें त्याच्या भालीं !
साखरगांवा परतायाला नव्हती जागा त्याला ;
दशवर्षांच्या सेवेचा अन् करार इकडे झाला !
फसगत झाली ऐशी, पाहुन डोळा आलें पाणी ;
गरिबाची पण कोण ऐकतो दुबळी सालस वाणी ?

तशांत झाले रङ्गराव अन् गणबा दृढतर मित्र,
रङ्गायाला पुढें लागलें अधिकाधिक तच्चित्र.
रङ्ग उडविले रङ्गरावनीं कोल्हाटणिच्या सङ्गं,
होतां भागीदार, धन्याचे गुलहौशी मन रङ्गें.
ओरड केली किती भिवानें चिडून अन्यायानें,
धन्यास वाटे करी कलङ्कित मज हा बदनामीनें !
भिवा, राबला कामकऱ्यापरि रानीं दिवसारातीं,
रङ्गरावनें आणि लावल्या गळ्यास त्याच्या तांती.
असें भिवानें काय मारिलें होतें घोडें त्याचें ?
दैव अकारण काय साधितें वैरच हितकर्त्याचें ?

एकावरती एक निघाल्या सरस पिकांच्या राशी ;
अलोट पैसा खेळूं लागे दुर्दम गणबापाशीं.
पिकतां शेती श्रीनें वाटे, केला रानीं वास ;
रङ्गरावचा गणबांना मग लागे पुरता ध्यास !
गणबा म्हणती–"रङ्गरावनीं किती गाळिला घाम ! "
दिसलें नाहीं परी कुणाला दीन भिवाचें काम ! !
निमुटपणानें काम करुन तो गाळित अश्रू राहे,
सेवाधर्मीं लिखित ललाटीं नित ठरलेलें का हें ?
रङ्गरावची भूक आंतली यानेंही नच शमली,
गणबाकानीं जिव्हा त्याची वीष आणखी वमली !

चमत्कार मग झाला ! कोणी कोल्हाटणिचें पोर—
करूं लागलें शेती, मिळतां रङ्गरावाचा जोर.
आणि भिवाला "गुरें, वासरें, म्हशी, मेण्ढरें सारीं—
डोङ्गरानीं रोज भेकणी चार ! " बोलली स्वारी.
गणबाचे हे शब्द जिव्हारीं भेदुनी गेले पार,
उरले होते करारांतले परन्तु महिने चार.
ऐन उमेदीमधलीं गेलीं दहा यापरी सालें,
मीठभाकरीपलीकडे त्या वैभव नव्हतें आलें.
"अता कुणाच्या जावें दारीं !"– लागुन हा हृद्रोग !
मेण्ढपाळ तो पिचुन आंतल्या आंतच भोगी भोग !

दोनच गेले मास, लागला लळा गुरांना त्याचा,
पुष्टि तयांची पाहुन जाई शीण जरा भिवबाचा.
जावें भिवबामागुन त्यांनीं खाउन चारापाणी,
रिझवी त्यांना गोन्जारूनी त्याची प्रेमळ वाणी.

आणि एक दिन भिवा न कोणा दिसला घरीं शिवारीं !
गणबांनीं अन् रङ्गरावनीं शोधशोधिलें भारी !
कायद्यामधें त्यास धराया बघती नीट करार;
सरला होता तोही—त्याला दिवस लोटले चार !
न कळे कोणा मुलांमाणसांसह तो गेला कोठें !
हम्बरण्यांनीं मात्र गुरांच्या भरले सारे गोठे ! !

२५ ऑगस्ट, ३८
पुणें

## ४५ रखेली !

[ भूमिका : रखेली म्हणून कुणी सुखासुखी रहातं का ? ]

[ जाति : सूर्यकान्त

व्यक्तिस्वातन्त्र्यानें केलें त्यास सहिष्णू पुरे,
शिकवण त्याची तिन्ही मुलींना गमले अमृतझरे.
करी प्रभातीं तयासङ्गतीं भावें तो प्रार्थना,
क्रूसा, चान्दा, स्वस्तिकास हो सारखीच वन्दना.
पवित्रशास्त्रप्रीती त्याची जरी प्रवचनीं दिसे,
कुराण-वेदांमधुनी निर्भर विहरत मति जातसे.
मातृहीन कन्यांस गमे तो पिता स्वमातेपरी,
विविध करी संस्कार, मनावर परि समतावैखरी.
क्रूस अमन्दा, अनार चान्दा, स्वस्तिक अरुणा वरी
शोभे सुवचन अनुरूप मुखीं, नेसण अङ्गांवरी.

२

रूपगुणीला तरुण कन्यका स्वच्छन्दी पांखरें—
पाहुनि त्याचें एकाकी मन आनन्दानें भरे.
वळण तयाचें थेट उतरलें पुरें अमन्देमधें,
अनारवदनीं साम्य सखीचें विलसे, हसतां मुदें.
स्वातन्त्र्याचा बाणा पाहे अरुणेअङ्गीं तिचा,
त्रिभिन्न ऐसा दिसला त्याला गाभा स्वप्रीतिचा.
म्हणुन आपुलीं स्मृतिविभवें तो पाहे त्यांच्या मुखीं,
जीवनतृप्ती सांठुन राहे त्याची, त्यांच्या सुखीं.
अशा पित्याची थोर संस्कृती अङ्कुरली तन्मनीं,
दृढतम झाली श्रद्धा त्यांची त्रिविध धर्मजीवनीं.

३

आणि एक दिन मावळते कर रविचे पडले घरीं,
बोल अन्तिचे त्यांस वदे तो घेउनि निजपांखरीं:—
“ बाळ अमन्दे ! ठीक तुझं—तो प्रभु तुजजवळीं असे !
अनार ! हसऱ्या वृत्तीमुळं तुज मिळेल पद थोरसें.
ध्येयासक्ती तीव्र तुझी, ग अरुणे ! मज आवडे;
पण तुज बाळे ! सहानुभूती मिळेल का कधिं, गडे !
आर्य स्त्री तूं भावशील....पण....जपुन पुढं चल जरा,
अमू, अनू....ही बहिण धाकुली ! तुमचा हिस आसरा ! ”
ओठ बोलले अस्फुट पुढती, पण डोळे झाकले !
आणि तयावर निवापाञ्जली कन्यांचें वर्षले !!

४

प्रेमळ बहिणी जणूं पांखरें बिलगुन निजकोटरीं,
ध्येयामागें बघती व्योमीं उडावया अन्तरीं.
जनसेवेचें शिक्षण ध्यावें जाउनि देशान्तरा,
तरि पहिलीनें किरण याचिले ख्रिस्तधर्मभास्करा.
महंमदाच्या धर्मजीवनीं जीव जिचा रङ्गला—
अनारचा त्या धर्ममण्डळा अर्ज झणीं पोचला.
अन् अरुणेची आर्यसंस्कृतिप्रीती हिन्दूकडे—
शुद्धीकरणासाठीं धावे, उचमळतां आंतडें.
सुफलित झाल्या सत्वर त्यांच्या चित्तांतिल कल्पना,
दुमदुमली पण सर्वांत नभीं शुद्धिवीरगर्जना !

५

जाय अमन्दा शिष्यवृत्तिनें परदेशा सांसव;
युवक कुणी दे सुविद्य पर्णुनि अनारला वैभव.
संसारेच्छू आणि अरूला-? हाय! धावली पुढें,
परि, न लाविती प्रीति सार्थकीं शुद्धीचे चौघडे.
"ख्रिस्तशिष्यजा!" म्हणुन निन्दिलें धर्मभास्करें कुणीं,
कोण पाहतो संस्कृति! कोणा तींच वाटली उणी!!
पोटागीस न तिच्या लाभली सहानुभूतिहि पुरी;
स्वधर्मनिधनश्रेया स्मरली जनकाची वैखरी!!
अनारच्या पतिसुहृदें कोणी अनुकम्पा दाविली,
'हिन्दु रखेली!' आणि म्हणुन ती त्याजवळी राहिली!!

१० नोव्हेम्बर, ३९
पुणें

## ४६ वणवण

[ छन्द : अभङ्ग

वणवण केली किती दीस तरी,
आग ही अन्तरीं थाम्बेचना.
विझवाया कोणा मागूं शान्त जळ,
कशी हळहळ निववूं ही ?
उगाच कां कधीं कालवतें पोटीं,
दाटूनिया ओठीं तीव्र भाव ?
अस्तवतां तेज भेसूरली छाया,
जिवा धीर द्याया कोण येई ?
न मिळे मजला माझा मागमूस,
करूं पासपूस कुणापाशीं ?

८ फेब्रुवारी, ३५
पुणें

## ४७ वेदना

[ छन्द : अभङ्ग

संसाराचा भार वाहुनी अपार,
शिणलों मी फार आजवरी !
हृदयींच्या आशा गेलों वाढवीत,
मज मी बान्धींत गुन्तविलें !
पाश उकलावे कोणत्या उपायीं ?
गेलों हातीं पायीं खिळूनीया !
पिन्जरा हा माझा उभारिला मींच
उगा बोलुनीच काय करूं ?
मनींच्या भुकेल्या वेदना सोसूनी—
राहतों गाळूनी आंसवें मी !
आणि घेतों डोळे मिटुनी मनाशीं,
तुझ्या स्वरुपाशीं एक व्हाया.

२२ जुलै, ३८
पुणें

## ४८ काढणी

[ छन्द : अभङ्ग

गोळा केलीं बीजें कसोशीनें सारीं,
सुक्षेत्रीं पाभरीं ओतिलीं-मीं;
उत्तम संस्कार केले कमाईनें,
विशुद्ध जीवनें चोजवीलीं;
रोपांरोपांतून वेचुनिया तण,
केली भाङ्गलण खपूनीया;
पावसाची धारा, ढगाचा निवारा
आणि उन वारा, लाभे दैवें;
डोळसपणानें राहूनी तत्पर
कीड केली दूर सत्वरसें;
काढणीस जातां कसदार आतां
भरदार हातां पीक देई.

२२ जुलै, ३८
पुणें

# ४९ सहकार

[ छन्द : अभङ्ग

कोय लावियेली, रोप मुगारलें,
सङ्गोपून दिलें खतपाणी ;
ऊन, थण्डी, वारा, पावसाच्या गारा,
करून निवारा वाढवीलें ;
सहकार झाला अभिजात तरू,
आनन्दानें भरूं मन लागे ;
आणि एक दिस डहाळी डहाळी-
पूर्ण डवरली मोहरानें ;
कोकिलकूजित सुरू झालें तेथ,
विपुळलें शेत गन्धगानीं ;
लागूनीया ओढ गेलों तरूखालीं,
तोच कडाडली शिरीं फान्दी ;
नको सावली ती,नको गन्धगान ;
पायीं तुझ्या स्थान एक बरें.

१५ ऑक्टोबर, ३८
पुणें

## ५० घायाळ !

[ छन्द : अभङ्ग

स्वभाळू तरङ्ग धरूनी उराशीं,
गाऊन आकाशीं भरारलों.
खाळून सूंसूंला बाण तों विषारी,
भेदूनिया उरीं पार गेला !
लागून रक्ताची धार, गिरगिरे,
निपचित धरे पडे, हाय !
पाहतों भोंवती ताम्बडें थारोळें;
तयांतच लोळे विव्हळुनी !
हेवा दावा नाश कुणाचा न केला,
दण्ड हा कशाला, कुणी केला ?
उन्ची माझी, माझ्या सत्वा ! तूंच आतां,
न तरी हा माथा कुठें ठेवूं ?

११ ऑक्टोबर, ४१
विश्रामबाग, साङ्गली

## ५१ वीर

[ छन्द : अभङ्ग

अन्तरङ्ग माझें समजेना कुणा,
कशाला मी उणा शब्द बोलूं ?
राखियलें यांना पसरूनी पांख,
ठेवूनिया आंख उन्चावरी,
भंवतींच्या जाळीं लागूं नेदी आंच,
ठाउका तो जाच मज माझा ;
भोसकती आतां दुर्वचांचे भाले,
डोळे अन्ध झाले काय यांचे ?
धरुनीया पोटीं तोच शुद्ध भाव,
सुविचारें घाव सोशितों मी.
तूंच मुक्या मारीं देई, आतां, धीर ;
मरणीं मी वीर व्हावें ऐशा.

११ नोव्हेम्बर, ४१
विश्रामबाग, साङ्गली

## ५२ शुद्धि ?

[ छन्द : अभङ्ग

पाहतोस कां तूं असा माझा अन्त ?
जिरवावी खन्त किती पोटीं ?
आग भडकोनी जाहला डोम्बाळा !
उफाळती ज्वाळा बाहेरी या !
भोंवतींच्यांनाही आतां लागे हाय,
तरीहि मी काय शान्त राहूं ?
सोसवती ना हे जिवाला चटके
पोळुनी, पळके गळती हे !
चालविली किंवा सोनियाची शुद्धि
हीच काय बुद्धि तुझ्या पोटीं ?

१२ मार्च, ४३
विश्रामबाग, साङ्गली

## ५३ मोक्ष

[ छन्द : अभङ्ग

मागील जन्मींचें असावें का वैर ?
वरीवरी फेर झडावी कां ?
पुन:पुन्हा व्हावी कां ही खिळेठोक ?
रक्ताळते खोक वेदनांनीं !
तीव्र सङ्गिनीची होय भोसकणी ;
कापी हिरकणी आंतड्यास !
कर्तव्याच्या माथीं कां हे असे घाव ?
काय असहाय करावया ?
यांतुनी ये मोक्ष कोणता हातास ?
माझ्या डोळियास दाविसीं का ?

१२ मार्च, ४३
विश्रामबाग, साङ्गली

# ५४ आगगाडी

[ **भूमिका :** पांचसहा वर्षांचा एक बालक आपल्या अङ्गणांतून दिसणाऱ्या आगगाडीला बोलावीत आहे. ]

[ छन्द :

आगगाडी ! आगगाडी ! धावत अशी,
येग बाई ! भकभक करांत कशी ! ध्रु० ॥
लवलव वांकडी तूं लवत जरा,
वळून ये आज बाई ! माझ्या तूं घरा !
शीट फुङ्क, खालीवर हात हालवी ;
चाकं आणि कुतरं हें लाल चालवी ;
वाऱ्यापरी बाई ! छान कशी चालशीं !
येग बाई ! भकभक करीत कशी ! १

चाकं किती घुरु घुरु फिरती तुझी,
उन्च ओझं सोसतात कशी ही खुजीं ?
डब्बे का हे, घरं कुणी छोटीं जोडलीं ?
इन्जनानं आणि त्यांची माळ ओढली !
" कशासाठीं ? पोटासाठीं. " काय बोलशीं ?
ये ग बाई ! भकभक करीत कशी ! २

ओरडुनी पुकतेस भकभकुनी,
पोट फुगे काय फार पाणी पिऊनी ?
कोळसे का खाशी पण तोण्ड भरुनी ?
जेवायला घालती न काय ग कुणी ?
दूधभात देईन मी माझा तुजशीं ;
ये ग बाई भकभक करीत कशी ? ३

काळा कोट विजार ही काळी घातली;
फडकीं हि रङ्गीत मी बघ घेतलीं;
फुङ्कून मी शिटी, हात दावीन तुला
लागतील दादा मग पहावयाला!
येतांच तूं, पण, घेई आंत मजशीं!
ये ग बाई! भकभक करीत कशी! ४

३० सेप्टेम्बर, ४३
विश्रामबाग, साङ्गली

## ५५ भाऊबीज

[ भूमिका : अठ्ठावीस वर्षांच्या भगिनी-प्रेमाला भाऊबीजेची ओवाळणी अशीच घालतां येईल. ]

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित

अठ्ठावीस युगें विटेवरी उभा राहूनही, लागले—
डोळे पुण्डलिकाकडे, हृदयही नामेंच त्या भागलें;
तें डोळ्यापुढती उदाहरण मी ठेवूनि अठ्ठाविस-
वर्षें घालविलीं, न पूर मग का येईल गे भक्तिस ?

भक्तीचे स्मरणांतले कितितरी घेऊन ऐसे मणी,
ताई, घालितसे कराञ्जलिंतुनी ही तूज ओवाळणी.

२४ सेप्टेम्बर, ३८
पुणें.

# रविकिरणमण्डळाचीं पुस्तकें